हें गीत चांदण्याचें

साहित्य प्रसार केन्द्र मुंबई चार
प्रकाशन क्र. ४७

प्रकाशन : डिसेंबर १९९३
**मूल्य पासष्ट रुपये**



मुखपृष्ठ : विष्णू जोशी
मांडणी : आनंदमन

मुद्रक आणि प्रकाशक
मोरेश्वर श्रीधर पटवर्धन
साहित्य प्रसार केन्द्र मुंबई चार
९, डॉ. देशमुख लेन, वि. पटेल रोड,
गिरगाव, मुंबई - ४०० ००४

अक्षरजुळणी : नॅशनल टाईप सेटिंग
३२, पारेख स्ट्रीट, मुंबई - ४००००४

छपाई : शिल्पार्ट
१५६, राजा बहादूर मोतीलाल मिल कंपाउंड,
ताडदेव, मुंबई ३४.

मुखपृष्ठ छपाई : मौज प्रिंटिंग ब्यूरो,
खटाववाडी, मुंबई - ४०० ००४.

प्रसन्न सहवासाने
माझ्या कवितेची वाटचाल
आनंदमय करणारे
माझे प्रियतम पती
श्री. किशोर
यांना

# ऋणानुबंध

शब्दांशी खेळणं हा माझा बालपणापासूनचा आवडता छंद आहे. लहान मुलं रंगीबेरंगी काचा, शंख, शिंपले गोळा करतात ना, तशी मी आवडलेले शब्द गोळा करायची नि त्यांतल्या नादाशी, लयीशी खेळत बसायची. आणि नकळत ते शब्द कवितेत गुंफले जायचे. असं शब्दांशी खेळता खेळता जाति, वृत्त, छंद यांच्याशी माझी मैत्री जमली. मग स्वतःचे अनुभव, पाहिलेले प्रसंग कवितेत गुंफायचं मला वेडच लागलं ! आठवतं तेव्हापासून मी असंख्य कविता लिहिल्या. नादलयीवरील प्रेमामुळं त्या कवितांनी छंदोबद्ध रूप धारण केलं होतं. हळूहळू यातल्या बऱ्याच कविता मासिकांमधून प्रसिद्ध झाल्या. कवयित्री म्हणून मला थोडीफार प्रसिद्धी मिळाली. एका रामप्रहरी चमत्कार झाला ! आकाशवाणीवरून एक गायिका चक्क माझी कविता गात होती. "त्या क्षणांचें वेड मजला का असें हें वेढितें ? मीं न माझी राहतें." माझेच शब्द मला नव्याने भेटत होते. माझ्याशी स्वरांच्या भाषेत बोलत होते. अंतर्बाह्य थरारून टाकणारी अनुभूती होती ती. सुनीती आपटे यांनी आकाशवाणीवर गायलेल्या त्या गीतानं, मी गीतकार आहे याची मला प्रथम जाणीव करून दिली. त्या क्षणी माझी कविता बोलकी झाली. गाण्याच्या रूपानं ती गायकांच्या ओठांवर नाचू लागली.

त्यानंतर माझ्या गीतांना बहरच आला. आकाशवाणी, ध्वनिमुद्रिका, नाटक, चित्रपट अशा अनेक माध्यमांसाठी मी गाणी लिहिली. बहुतेक सुप्रसिद्ध संगीतकारांबरोबर गाणी लिहायची मला संधी मिळाली. अनेक नामवंत जुन्या नव्या गायकगायिकांनी माझ्या गाण्यातलं चांदणं घरोघर पोहोचवलं. ओठाओठांवर नाचवलं. रसिक श्रोत्यांनी तर अल्पावधीत मला भरपूर प्रतिसाद दिला. या काळात माझं कवितालेखनही चाललंच होतं. पण गीतरचनेचं चांदणं मला जास्त आकर्षित करीत होतं. शब्दांमधला नाद आणि लय यांची मनापासून आवड असल्याने गीतरचनेत माझं मन अधिकच तल्लीन व्हायचं.

त्या काळात कवीनं स्वतंत्रपणं गीत लिहायचं आणि मग संगीत-दिग्दर्शकानं त्या गीतांवर स्वरांचा साज चढवायचा ही पद्धत विशेष प्रचलित होती. या बाबतीत माझी गाणी फारच भाग्यवान ठरली. संगीतकार दशरथ पुजारी, दत्ता डावजेकर, मधुकर गोळवलकर, प्रभाकर जोग, श्रीनिवास खळे, यशवंत देव, बाळ बर्वे,

विश्वनाथ मोरे अशा थोर प्रतिभावंत संगीतकारांनी माझ्या गाण्यांना सुंदर सुंदर चालींनी सजवलं. सगळ्याच संगीतकारांनी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे मला रचनेतले बारकावे शिकवले. त्यावेळच्या बहुतेक प्रसिद्ध गायकांनी आकाशवाणीवरून माझी गाणी गायली आहेत. आकाशवाणीनं माझ्या गाण्यांना अंगाखांद्यावर खेळवलं असं म्हणायला हरकत नाही ! त्यामुळे माझी बरीच गाणी लोकप्रिय झाली.

'परीकथेतिल राजकुमारा' हे त्यांपैकी सगळ्यात गाजलेलं गाणं. या गाण्याच्या निर्मितीची गोष्ट सांगण्यासारखी आहे. त्यावेळी आकाशवाणीवर 'भावसरगम' हा कार्यक्रम खूप लोकप्रिय होता. एकदा संगीतकार अनिल मोहिले यांना 'भावसरगम'साठी गाणं सादर करायची संधी मिळाली. ते माझ्याकडे आले नि म्हणाले, "वंदनाताई, मला ताबडतोब एक मस्तपैकी प्रेमगीत लिहून द्या. पण नेहमीसारखं नको. काहीतरी फँटॅस्टिक लिहा."

मी सहज म्हटलं, "म्हणजे परीकथा, स्वप्ननगरी, राजकुमार असं काहीतरी लिहावं लागेल मला."

ते चट्कन् उद्गारले, "हां हां. असंच काहीतरी पाहिजे."

मी त्यावेळी अद्भुतरम्य वातावरणातच वावरत होते. मुलांसाठी लिहिलेल्या माझ्या एका कल्पनारम्य नाटकाची निर्मिती चालली होती. त्याच तंद्रीत मी विचारलं, "परीकथेंतिल राजकुमारा, स्वप्नीं माझ्या येशिल का ? भाव दाटले मनीं अनामिक, साद तयांना देशिल का ?" या ओळी कशा वाटतात ?"

"वा वा ! फारच छान ! हाच मुखडा ठेवू आपण. पुढं लिहा". अनिलजी म्हणाले.

त्याच तंद्रीत मी पुढची कडवी लिहून काढली. अनिलजींनी गाणं उतरवून घेतलं नि ते गुणगुणतच घरी निघाले. आणि जाता जाता बसमध्ये त्यांना चाल सुचली सुद्धा ! बसच्या तिकीटावर त्यांनी नोटेशन लिहिलं. घरी पोचताच फोनवरून मला चाल ऐकवली. फारच छान होती चाल ! गाण्यासारखीच तरल, हळुवार, स्वप्नरम्य ! लगेच गाण्याचं ध्वनिमुद्रण झालं. सुप्रसिद्ध गायिका कृष्णा कल्ले यांनी अत्यंत रसीलेपणानं ते गाणं गायलं. त्यांचा लाडिक आवाज आणि अनिलजींची रसीली स्वररचना यांचा सुंदर संगम या गाण्यात झाला ! 'भावसरगम'मध्ये हे गाणं तुफान गाजलं ! आम्हा तिघांची आणखीही काही गाणी यशस्वी झाली, पण, 'राजकुमारा'चा क्रमांक पहिलाच राहिला.

संगीतकार श्रीकांत ठाकरे एकदा मला गमतीनं म्हणाले, "कसले तुम्ही मराठी कवी ! नुसती दळुबाई गाणी लिहिता. तेच शब्द, नित्याच्या रचना. हिंदी कवी बघा. कसे चालींवर गाणी लिहितात. म्हणून त्यांच्या रचना नवीन वाटतात."

मी म्हटलं, "मला नाही आवडत चालीवर गाणं लिहायला."

त्यावर ते पट्कन् म्हणाले, "चालीवर लिहीता येत नाही म्हणून सरळ सांगा ना !"

मग मात्र मी चिडले नि म्हणाले, "कोण म्हणतं लिहिता येत नाही म्हणून ? मी देते तुमच्या चालीवर गाणं लिहून ! बघू या कसं नाही जमत ते !"

श्रीकांतजींनी मला मालकंस रागातली एक चाल ऐकवली. चाल म्हणजे काय ? नुसते सूरच. त्या सुरात शब्दांचे मोती गुंफायचे होते, ते म्हणाले, "या चालीवर भक्तिगीत पाहिजे मला. पण नेहमीसारखं नको. काहीतरी वेगळं लिहा."

बापरे ! चालीचं बंधन. विषयाचं बंधन. म्हणजे हे तर शुद्ध गणितच झालं की ! इथं कल्पना सुचणार कशा ? नि काव्य उमलणार कसं ? पण आव्हान तर स्वीकारलं होतं. आता माघार नाही, असं ठरवलं. कल्पना खूप सुचत होत्या, पण चालीच्या कुंपणात त्या बसेनात. मात्र श्रीकांतजींची सुरावट फार छान होती. ती पुन्हा पुन्हा ऐकताना मी त्याच्यातल्या भावरसाशी एकरूप झाले. आणि साक्षात्कार व्हावा तशा मला ओळी सुचल्या,

"शोधिसी मानवा, राउळीं मंदिरीं
नांदतो देव हा, आपुल्या अंतरीं"

मुखडा ऐकताच श्रीकांतजी म्हणाले, "छान ! पुढं लिहा."

पुढचं काम सोपं होतं. मला चालीचा सूर सापडला. मी भराभर वेगवेगळ्या कल्पनांची पाच सहा कडवी लिहिली, त्यातली तीन कडवी निवडली. आणि चालीवर लिहिलेलं माझं पहिलं गाणं जन्माला आलं ! तोपर्यंत गाणं कोण गाणार हे मला माहीत नव्हतं. पण थोर गायक महमद रफी माझं गाणं गाणार आहेत आणि त्यांचं हे पहिलंच मराठी गाणं आहे असं श्रीकांतजींनी सांगितलं, तेव्हा मी अक्षरशः भारावूनच गेले ! ते माझे अत्यंत आवडते गायक ! स्वप्नात सुद्धा ही कल्पना येणं शक्य नव्हतं. पण श्रीकांतजी ठाकरे यांच्यामुळे हे स्वप्नापलिकडचं स्वप्न प्रत्यक्षात आलं ! रफीजींनी पहिलंच मराठी गाणं गायलं, ते माझं आणि तेही आधी तयार

असलेल्या चालीवर रचलेलं माझं पहिलंच गाणं !

'शोधिसी मानवा' हे गाणं लिहिल्यावर माझ्या लक्षात आलं की चालीवर गाणं लिहिणं हा तर शब्दस्वरांचा खेळ आहे. शब्दांवर प्रेम असलं, नादाशी मैत्री जमली आणि लयीचा पदन्यास आवडला तर गीतरचना करणं आनंददायकच वाटणार. त्यात कारागिरी असेल, पण ती आव्हानात्मक आहे. या कारागिरीतून नवीन आकृतिबंध सापडतात. शब्दांची नवनवीन रचना करण्याचा आनंद अनुभवता येतो. शब्दांचं भांडार आणि रचनेचं सामर्थ्य असलेल्या कवीला हे आव्हान सहज पेलता येतं. चालीचा तांत्रिक रुक्षपणा जाणवू न देता गाण्यातलं काव्य फुलवण्याची चतुराई असली तर चांगलं गाणं ही चांगली कविता होऊ शकते. अर्थात् चालीवर गाणी लिहिताना कवीच्या कल्पनास्वातंत्र्यावर बंधन येतं हेही खरं आहे. तरीही नवीन आव्हान म्हणून मी त्यानंतरची बहुतेक गाणी चालीवर लिहिली. प्रत्येक संगीतकाराच्या विविधरंगी स्वररचनांवर शब्दांची नक्षी कोरताना वेगळाच आनंद वाटला.

कारागिरी असली तरी तिच्यासाठीही योग्य मनःस्थिती असावीच लागते. एकदा याच कारणामुळं माझं गाणं अडून बसलं. संगीतकार अनिल-अरुण यांच्या एका गाण्याचं ध्वनिमुद्रण ठरलं होतं. अरुण पौडवाल यांनी सुंदर चाल बांधली होती. ध्वनिमुद्रणाची तारीख येऊन ठेपली तरी माझं गाणं तयार होईना. कारण माझे पती चंद्रकांत विटणकर यांच्या डोळ्यावर शस्त्रक्रिया झाली होती. माझं चित्त थाऱ्यावर नव्हतं. त्यांच्या काळजीनं ग्रासलेलं मन गाणं लिहायला तयार होईना. मी अरुणजींना फोन करून सांगितलं, "माझ्याकडून गाणं लिहून होणार नाही. नाइलाज आहे माझा. तुम्ही कृपा करून दुसऱ्या कवीकडून गाणं लिहून घ्या. आणि ध्वनिमुद्रण पार पाडा."

अरुणजी शांतपणे म्हणाले, "वंदनाताई, मला गाणं तुमच्याकडूनच हवं आहे. तुमची मनःस्थिती मी समजू शकतो. पण प्रयत्न तर करा. मला खात्री आहे की तुम्ही गाणं लिहाल."

"अहो, कसं शक्य आहे ? कसं लिहू मी गाणं ? काही सुचतच नाहीय्."

ते उत्तरले, "असंच काहीतरी लिहा. 'कसं लिहू गाणं' वगैरे."

मी सुन्नपणे विटणकरांच्या शेजारी येऊन बसले. त्यांच्या डोळ्यांवर पट्टी होती. अजून ते गुंगीतच होते. काय होईल ? कसं होईल ? ही चिंता मनात दाटलेली. सहज

विचार आला, रसिक श्रोते गाणं ऐकतात. शब्दांच्या आणि स्वरांच्या सौंदर्यानं धुंद होतात. पण गाणं लिहितानाची कवीची मन:स्थिती त्यांना कळत असेल का? हा विचार मनात येताच काय झालं कुणास ठाऊक. वीज चमकावी तशा मला गाण्याच्या ओळी सुचल्या.

"रसिका, मी कैसें गाऊं गीत?
दाटून आले घन आसवांचे मिटलेल्या पापणींत."

ती ओळ सुचताच मन एका अनामिक भावनेनं थरारून गेलं! त्या मन:स्थितीतही भरभरून आनंद झाला! त्याच भारलेल्या तंद्रीत गाण्याची पुढची कडवी लिहून झाली. खरंच, अशावेळी वाटतं, हे सारं आपण नाही करीत. कुणीतरी आपल्याकडून करवून घेतं! मी लगेच अरुणजींना फोन केला नि संपूर्ण गाणं फोन-वरूनच वाचून दाखवलं.

खूष होऊन ते उद्गारले, "वा! किती छान लिहिलंत हो गाणं! शब्द इतके भावपूर्ण आहेत की ऐकताना मला नवीन जागा सुचल्या. थांबा. गाणं लिहून घेतो."

रुग्णालयातल्या फोनवरून एका कवीनं संगीतकाराला ऐकवलेलं, गाण्यांच्या इतिहासातलं हे बहुधा पहिलंच गाणं असेल! अनुराधा पौडवाल यांनी अत्यंत समरसतेनं गायलेलं हे गाणं खूप लोकप्रिय झालं. याचं संपूर्ण श्रेय अरुण पौडवाल यांनाच आहे.

खाजगी ध्वनिमुद्रिकांसाठी लिहिता लिहिता चित्रपटगीतांच्या क्षेत्रातही माझा प्रवेश झाला, तो एका योगायोगानंच. 'आम्ही जातो अमुच्या गावा' या चित्रपटासाठी जगदीश खेबुडकर यांनी गाणी लिहिली आहेत. संगीतकार सुधीर फडके यांनी त्यांची पाच गाणी ध्वनिमुद्रित केली. एकच गाणं राहिलं होतं. पण खेबुडकर अचानक आजारी पडले. त्यामुळे त्यांच्याकडून गाणं मिळणं शक्यच नव्हतं, आणि ठरलेलं ध्वनिमुद्रण रद्द करता येत नव्हतं. चित्रपटाचे दिग्दर्शक कमलाकर तोरणे अस्वस्थ झाले. त्यांना काय वाटलं कुणास ठाऊक. ते माझ्याकडे आले नि त्यांनी माझी गाण्यांची वही मागितली. बराच वेळ ते वही चाळत होते. अचानक त्यांना एक गाणं सापडलं. त्यांनी ते पुन्हा पुन्हा वाचलं नि म्हणाले, "वंदनाबाई, हे गाणं मला लिहून द्या. माझ्या चित्रपटातल्या प्रसंगाला अगदी अनुरूप आहे."

मी विचारलं, "कुठला प्रसंग?"

पण ते न सांगताच ते घाईघाईनं म्हणाले, "उद्याच रेकॉर्डिंग आहे बॉम्बे लॅबला.

तुम्ही आलंच पाहिजे बरं का !" मी काही बोलण्यापूर्वीच ते निघून गेले.

दुसऱ्या दिवशी खरंच माझ्या गाण्यांचं ध्वनिमुद्रण झालं. सुधीर फडक्यांची भावमधुर चाल आणि आशा भोसलेंची बहारदार रसीली गायकी यांचा अपूर्व संगम होता तो !

"उजळूं स्मृती कशाला, अश्रूत दाटलेली
सांगूं कशी कहाणी स्वप्नात रंगलेली."

हे ते गाणं.

मध्यंतरी बराच काळ निघून गेला. आणि एका सुप्रभाती मला ती शुभवार्ता समजली. 'आम्ही जातो अमुच्या गावा' या चित्रपटातल्या माझ्या गाण्याला त्या वर्षीचं उत्कृष्ट गीताचं पारितोषिक मिळालं होतं. चित्रपटातलं माझं पहिलंच गाणं, नि त्याला सर्वोत्कृष्ट गाण्याचं पारितोषिक ? माझ्या आयुष्यातली अगदी अघटित घटना ! अर्थात थोर संगीतकार सुधीर फडके आणि स्वरकिन्नरी आशा भोसले यांच्या प्रतिभेची पुण्याईच मला हे यश देऊन गेली हेच खरं.

त्यानंतर मी अनेक चित्रपटांसाठी गाणी लिहिली. संगीतकार राम-लक्ष्मण अनिल-अरुण, राम कदम, अशोक पत्की, बाळ पळसुले या प्रतिभावंत संगीतकारांबरोबर काम करण्याची संधी मिळाली. त्यांच्या वेगवेगळ्या शैलीच्या स्वररचनेवर गाणी लिहिताना मला खूप गोष्टी शिकता आल्या. या सर्व संगीतकारांच्या सहकार्याचा माझ्या यशात फार मोठा वाटा आहे.

अनेक प्रतिभावंत गायकांनी माझ्या शब्दांवर रसीला स्वरवर्षाव केला. त्यामुळेच ती गाणी भावपूर्ण होऊन रसिकमनांना आनंद देऊ शकली. सुरेश वाडकर, रवींद्र साठे, सुदेश भोसले, हेमंतकुमार, मन्ना डे, विनय मांडके, अजित कडकडे, जयवंत कुलकर्णी, आशा भोसले, प्रभा अत्रे, उषा मंगेशकर, अनुराधा पौडवाल, उत्तरा केळकर, रंजना जोगळेकर, देवकी पंडित, अनुपमा देशपांडे, पुष्पा पागधरे, अपर्णा मयेकर, कविता कृष्णमूर्ती, सुलोचना चव्हाण, शोभा गुर्टू या सर्वच दर्जेदार गायक-गायिकांनी माझ्या शब्दांना जोजवलं. त्यांचं ऋण कसं व्यक्त करू ?

माझे पती श्री. विटणकर हे तर माझं प्रेरणादायक स्फूर्तिस्थान ! माझी प्रतिभा त्यांनी सतत ताजी टवटवीत ठेवली. माझ्यातली कविता मनःपूर्वक जोपासली. वळणदार अक्षरांत माझी गाणी वहीत उतरवून ठेवण्यापासून, विफल, विमनस्क मनःस्थितीतून मला सतत फुलवण्याचे सायास त्यांनी नितांत प्रेमानं केले. वेळोवेळी

माझ्या लेखनाला प्रसन्न दाद देऊन लेखणी प्रफुल्ल रसरशीत केली. त्यांच्या सक्रिय प्रोत्साहनाशिवाय माझ्या काव्यलेखनाचा इथपर्यंतचा प्रवास सफल होऊच शकला नसता.

शिरीष पै हे माझं आणखी एक प्रेरणास्थान. त्यांचा जिव्हाळा, माझ्यावरचं अकृत्रिम प्रेम, मोलाचं मार्गदर्शन मला नेहमीच प्रेरक ठरलं आहे. माझ्या काव्यलेखनाचा आत्मा अचूक जाणून, त्याचं सुंदर रसग्रहण त्यांनी वारंवार केलं. शिरीषताईंचं ऋण आभारापलीकडचं आहे.

'गाणी ! मनातली; गळ्यातली !' या पुस्तकप्रकल्पाचे संपादक व प्रकाशक मोरेश्वर पटवर्धन यांनी गेल्या सुमारे शंभर वर्षांतली रसिकांना भावलेली ११११ गाणी संग्रहीत केली, हे मराठी गानरसिकांच्या दृष्टीनं मोठं सांस्कृतिक कार्य आहे. त्या संग्रहांमध्ये तर त्यांनी माझी गाणी घेतलीच, पण हा माझा पहिला गीतसंग्रह तेच प्रकाशित करीत आहेत याची मला धन्यता वाटते. ते स्वतः कवी आहेत. रसिक जाणकार आहेत. वाङ्मयाचे व्यासंगी आहेत. त्यांनी जिद्दीनं, चिकाटीनं आणि कमालीच्या सहृदयतेनं माझ्याकडून हे काम करवून घेतलं नसतं तर हा संग्रह साकार होऊच शकला नसता.

माझ्या निवडक गीतांचा हा संग्रह पाहून आज माझं मन भारावून गेलं आहे. या गीतांनी आजपर्यंत मला किती भावपूर्ण साथसोबत केली ! गौरवानं मिरवावी अशा भावक्षणांची केवढी श्रीमंती दिली ! भरपूर लौकिकाचा नजराणा मला बहाल केला. या प्रत्येक गीतातल्या शब्दांच्या चांदण्यानं माझ्या मनाचा गाभारा दरवळून गेला आहे. रसिकांच्या मनातही या गीतांची किरणं आनंद पसरवतील अशी मला आशा आहे.

१० ऑगस्ट, १९९३ *वंदना विटणकर*

# अनुक्रम

# मंगलमूर्ती मोरया

मंगलदिन हा सोनियाचा, मंगलमूर्ती येइ घरा
श्रीगणेशा मोरया, मंगलमूर्ती मोरया
मोरया मोरया, गणपतिबाप्पा मोरया
सिद्धिविनायक गजानना, मंगलमूर्ती मोरया ॥ धृ. ॥

सिंदुरचर्चित रूप शुभंकर, रत्नसुशोभित मुगुट शिरीं
कुंकुमकेशर गजवदनावर, पाशांकुश हे उभय करीं
मोरया मोरया, गिरिजात्मका मोरया
सिद्धीनाथा गणाधीशा, कर्पुरगौरा मोरया ॥ १ ॥

कोटिसूर्यसम तेज कांतिचें, प्रणवरूप हा गणराया
गौरिसुताच्या दर्शनमात्रें, दुःख संकटें जाति लया
मोरया मोरया वरदविनायक मोरया
आदीनाथा सुराधीशा, बुद्धिसागरा मोरया ॥ २ ॥

गायिका - अनुराधा पौडवाल, संगीत - अनिल-अरुण

# परीकथेंतिल राजकुमारा

परीकथेंतिल राजकुमारा, स्वप्नीं माझ्या येशिल का ?
भाव दाटले मनीं अनामिक, साद तयांना देशिल का ? ॥ धृ. ॥

या डोळ्यांचे गूढ इषारे
शब्दांवांचुन जाणुन सारे
'राणी अपुली' मला म्हणोनी, तुझियासंगें नेशिल का ? ॥ १ ॥

मूर्त मनोरम मनीं रेखिली
दिवसा रात्रीं नित्य देखिली
त्या रूपाची साक्ष जिवाला, प्रत्यक्षांतुन देशिल का ? ॥ २ ॥

लाजुन डोळे लवविन खालीं
नवख्या गालीं येइल लाली
फुलापरी ही तनू कांपरी, हृदयापाशीं घेशिल का ? ॥ ३ ॥

लाजबावरी मिटुन पापणी
साठवीन तें चित्र लोचनीं
नवरंगी त्या चित्रामधलें, स्वप्नच माझें होशिल का ? ॥ ४ ॥

गायिका - कृष्णा कल्ले, संगीत - अनिल मोहिले

---

# हें गीत चांदण्याचें

हें गीत चांदण्याचें माळून ये पुन्हा
ते स्पर्श भारलेले घेऊन ये पुन्हा ॥ १ ॥

अभिसार यौवनाचा सैराट उसळलेला
आवेग तो अनोखा लेवून ये पुन्हा ॥ २ ॥

झोकून जन्म सारा प्रीतींत लोपवाया
अवघेच बंध सजणी तोडून ये पुन्हा ॥ ३ ॥

देहांत दाटलेला हा पूर मीलनाचा
त्या चिंब भावनेनें न्हाऊन ये पुन्हा ॥ ४ ॥

छळती मला स्मृतींच्या या सैरभैर लाटा
जगण्यास तूं किनारा होऊन ये पुन्हा ॥ ५ ॥

गायक - रवींद्र साठे, संगीत - शांक-नील

## दुःख माझें हें मुकें !

अंतरंगीं रंगलेलें गीत झालें पोरकें
दुःख माझें हें मुकें ! ॥ धृ. ॥

बहरलेल्या मीलनाचे सूर होते लागले
चित्र मोहक नंदनाचें लोचनांनीं पाहिलें
उघडतां परि नेत्र केवळ भोवतीं दाटे धुकें ॥ १ ॥

बंध सारे तोडुनी मी घेतली होती उडी
अमृतानें नाहली रे उत्सवाची ती घडी
त्या स्मृतीचा कैफ लेवुन आज हंसती हुंदके ॥ २ ॥

तव स्मृतीचा कोष बसला विश्व माझें व्यापुनी
सहज तूं गेलास अदया, सर्व धागे तोडुनी
क्षणभरी उमलून विरलें स्वप्न नवथर लाडकें ॥ ३ ॥

वंचनेची यातना रे दे मला तूं लाखदा
मजवरी केलीस प्रीती सांग परि हें एकदा
क्षण सुखाच्या मोहराचे फिरुन होतिल बोलके ॥ ४ ॥

गायिका - कृष्णा कल्ले **संगीत** - अनिल मोहिले

## शोधिसी मानवा

शोधिसी मानवा, राउळीं मंदिरीं
नांदतो देव हा, आपुल्या अंतरीं ॥ धृ. ॥

मेघ हे दाटती, कोठुनी अंबरीं ?
सूर येती कसे, वाजते बांसरी ?
रोमरोमीं फुले, तीर्थ हें भूवरी
दूर इंद्रायणी, दूर ती पंढरी ॥ १ ॥

गंध कां हांसतो, पाकळी सारुनी ?
वाहते निर्झरी, प्रेमसंजीवनी
भोंवतालीं तुला, साद घाली कुणी
खूण घे जाणुनी, रूप हें ईश्वरी ॥ २ ॥

भेटतो देव का, पूजनीं अर्चनीं ?
पुण्य का लाभतें, दानधर्मांतुनी ?
शोध रे दिव्यता, आपुल्या जीवनीं
आंधळा खेळ हा खेळशी कुठवरी ? ॥ ३ ॥

गायक - महंमद रफी, संगीत - श्रीकांत ठाकरे

## हे मना

हे मना, आज कोणी बघ तुला साद घाली
जाण रे दाटलेली, ही किमया भोवतालीं ॥ धृ. ॥

हा वारा तान घेई
निर्झरही साथ देई
गुणगुणती दिशा दाही
घे जाणून मूक बोली ॥ १ ॥

वेद गाती, रम्य लाटा
फूल फुलवी गंधगाथा
किरण होउन रे विधाता
लोपवीतो रात्र काळी ॥ २ ॥

शोधिसी तूं सौख्य कोठें ?
जीवनाशीं जोड नातें
साठला रे स्वर्ग येथें
राहिली कां रिक्त झोळी ? ॥ ३ ॥

गायक - महंमद रफी, संगीत - श्रीकांत ठाकरे

# सोड ना अबोला !

हा रुसवा सोड सखे ! पुरे हा बहाणा
सोड ना अबोला !
झुरतों तुझ्या विना,
घडला काय गुन्हा ?
बनलों निशाना
सोड ना अबोला ! ॥ धृ. ॥

इष्काची दौलत उधळि तुझा हा नखरा
मुखचंद्राभवतीं कितीक फिरती नजरा
फसवा राग तुझा, अलबेला नशिला
करि मदहोश मला
नुरलें भान अतां, जाहला जीव खुळा ॥ १ ॥

तुझे फितूर डोळे गाती भलत्या गजला
मदनानें केलें मुष्किल जगणें मजला
पाहुनी मस्त अदा, फुले अंगार असा
सावरूं तोल कसा ?
नको छळवाद अतां, झालों कुर्बान तुला ॥ २ ॥

गायक - महंमद रफी, संगीत - श्रीकांत ठाकरे

## प्रभू भोवतालीं असे व्यापलेला

नको आरती कीं नको पुष्पमाला
प्रभू भोवतालीं असे व्यापलेला ॥ धृ. ॥

खगांच्या मुखानें प्रभू गाइ गाणें
फुलांतून उधळी सुगंधी उखाणे
गगनांत फुलवी, नवरंग-लीला ॥ १ ॥

सदासर्वकाळीं दुज्यांसाठिं झिजतो
पुण्यवान जगतीं खरा तोच जगतो
त्यागांत मनुजा, उभा स्वर्ग भरला ॥ २ ॥

प्रकाशांत फुलतो अंधार काळा
उन्हापाठिं पळतो कसा पावसाळा
बुडे प्रेमरंगीं, कळे खेळ त्याला ॥ ३ ॥

गायक - महंमद रफी, संगीत - श्रीकांत ठाकरे

# अग पोरी, संबाल

तो - अग पोरी, संबाल दर्याला तुफान आयलंय् भारी
ती - लाट पिर्तीची, भन्नाट होऊन आभालिं घेई भरारी

तो - नाय भिनार ग, येऊं दे पान्याला भरती
ती - माज्या होरीचं, सुकान तुज्याच हातीं
तो - नाव हाकीन मी, कापीत पाऊसधारा
ती - मनिं ठसला रं, तुजा ह्यो मर्दानि तोरा
तो - जाल्यांत गावली सोनेरिं मासली
ती - नको करूं शिर्जोरी
तो - अग पोरी, संबाल दर्याला तुफान आयलंय् भारी

तो - तुज्या डोल्यांत ग, घुमतोय् वादलवारा
ती - तुज्या भवतीं रं, फिरतोय् मनाचा भौरा
तो - तुला बगून ग, उदान आयलंय् मनाला
ती - तुज्या पिर्तीचं, काहूर जाली जिवाला
तो - सुटनार नाय ग, तुटनार नाय ग
ती - तुजी नि माजी जोरी
तो - अग पोरी, संबाल दर्याला तुफान आयलंय् भारी

तो - मी आनिन तुला, जर्तारी अंजीरि सारी
ती - मला पावली रं, पिर्तीचि दौलत न्यारी

तो - मी झुंजार ! साजिरी तू माजी नौरी

ती - तुज्या संगतीनं, चाखीन सर्गाची गोरी

तो - थाटांतमाटांत गुल्लाबी बंगला

ती - बांदूं या दर्याकिनारीं

तो - अग पोरी, संबाल दर्याला तुफान आयलंय् भारी

गायक - महंमद रफी व पुष्पा पागधरे, संगीत - श्रीकांत ठाकरे

## विरलें गीत कसें ?

विरलें गीत कसें ? झालीं मनाचीं शकलें
मी दिशाहीन अतां, सारे सहारे मिटले ! ॥ १ ॥

गाइलें गीत कधीं, फुलवीत बसंती नातें
विझले सूर अतां, नयनांत खुळी आस जळे ! ॥ २ ॥

गहिरी याद तुझी, मोहरते खोल मनीं
विसरूं हाय कसे, ते इशारे सगळे ! ॥ ३ ॥

नव्हता दोष तुझा, शापियलें मींच मला
लोपल्या दाहि दिशा, दूर किनारे लपले ! ॥ ४ ॥

गायक - महंमद रफी, संगीत - श्रीकांत ठाकरे

# खेळ तुझा न्यारा

तुझें सर्वरंगी रूप, उदारा, कळलें सांग कुणाला ?
खेळ तुझा न्यारा, प्रभु रे, खेळ तुझा न्यारा ! ॥ ध्रु. ॥

स्वार्थाभवती दुनिया फिरते
बेइमान ठरते भलाई
सौद्यासाठीं जुळतें नातें
फसवा भावफुलोरा ! ॥ १ ॥

आशेमधुनी जीवन फुलतें
मरणाशीं अडतें पाऊल
हें मायावी मृगजळ खोटें
उरतो दूर किनारा ! ॥ २ ॥

दोन दिसांची सगळीं नातीं
कुणी न अंतीं उरे सोबती
पैलतिराची हांक ऐकतां
स्मरतो एक सहारा ! ॥ ३ ॥

गायक - महंमद रफी, संगीत - श्रीकांत ठाकरे

## हा छंद जिवाला लावि पिसें

तुझें रूप सखे गुलजार असें
काहूर मनीं उठलें भलतें
दिनरात तुझा ग ध्यास जडे
हा छंद जिवाला लावि पिसें ! ॥ धृ. ॥

ती वीज तुझ्या नजरेमधली
गालीं खुलते रंगेल खळी
ओठांत रसेली जादुगिरी
उरिं हसति गुलाबी गेंद कसे ! ॥ १ ॥

नखऱ्यांत तुझ्या ग मदनपरी
ही धून शराबी दर्दभरी
हा झोक तुझा घायाळ करी
कैफांत बुडालें भान असें ! ॥ २ ॥

ती धुंद मिठी, बेबंद नशा
श्वासांत सखे विरतात दिशा
बेहोष सुखाच्या या गगनीं
मी आज मला हरवून बसें ! ॥ ३ ॥

गायक - महंमद रफी, संगीत - श्रीकांत ठाकरे

## गा प्रकाशगीत !

अंधाराची खंत तूं कशाला करिसी रे ?
गा प्रकाशगीत ! ॥ धृ. ॥

रोज नवी ही उषा उगवते
कवच भेदुनी अंधाराचें
कळीकळीच्या कोषामधुनी
निसर्ग गातो गीत उद्याचें
संजीवन हसतें नाशामधुनी, हीच जगाची रीत ॥ १ ॥

दुःख निराशा दूर सारुनी
सदा पडावें पाउल पुढती
गतकाळाची कशास भीती ?
भविष्य अपुलें अपुल्या हातीं
तुझ्या मुठींतुन फुलव निराळें तूंच तुझें संचीत ॥ २ ॥

गायक - जयवंत कुलकर्णी, संगीत - डी. एस्. रुबेन

---

## तें स्वप्न भाववेडें

तो - तें स्वप्न भाववेडें नयनीं समूर्त होतें
फुलतें मनांत माझ्या अपुलें अबोल नातें ! ॥ धृ. ॥

ती भेट पापण्यांची धुंदावल्या क्षणांची
ती - कायाच जाहली रे जणु बांसरी विजेची
त्या मूक गुंजनाच्या धुंदींत मी नहातें ॥ १ ॥

ती - माझ्याहुनी सख्या रे झाली अधीर वाणी
तो - शब्दास रूप येतां ती लाजली कहाणी
ती - परि ओढ अंतरींची खुलुनी असीम होते ॥ २ ॥

तो - जाणीव मीपणाची ध्यासामधें बुडाली
ती - भासाविना नसे रे कांहींच भोवतालीं
तो - मग बावऱ्या स्मृतीला स्वप्नांत जाग येते ॥ ३ ॥

तो - पाऊल प्रीतिचें हें चाहूल मन्मथाची
दोघे - काहूर गोड वाटे, ही खूण या पथाची
दाही दिशांत आतां घुमती अनंग-गीतें ॥ ४ ॥

गायक - सुधीर फडके व उषा वाघ, संगीत - सुधीर फडके

## सूर सूर संपले

तो - भावविकल ओठावर शब्द मूक जाहले
आर्त धुंद गीतांतिल सूर सूर संपले ! ॥ धृ. ॥

ती - नवरंगी चित्र एक मोहरलें लोचनांत
आली बहरून रम्य प्रीतीची चांदरात
त्या फुलल्या पुनवेचें बिंब कुठें लोपलें ? ॥ १ ॥

तो - श्वासांनीं रेखियली स्वप्नबावरी कथा
गंधानें थरथरली मुग्ध लाजरी लता
त्या गंधित बहराचें विश्व आज भंगलें ! ॥ २ ॥

ती - जळणाऱ्या हृदयाला समजावूं सांग कसें !
तो - मिटवूं मी सांग कसें फुललेलें फूल असें !
दोघे - अपुलें तें गूज अतां आसवांत साठलें ! ॥ ३ ॥

गायक - सुधीर फडके व उषा वाघ, संगीत - सुधीर फडके

# कसा ग विसरूं तो सोहळा ?

क्षणाभोवतीं त्याच रंगतो अजून जीव खुळा
कसा ग विसरूं तो सोहळा ? ॥ धृ. ॥

नजरभेट ती वीजबावरी
मनांत घुमली धुंद बासरी
मिटल्या ओठांतुनी मनांतिल गंध फुलूं लागला ॥ १ ॥

झुकतां खालीं तुझी पापणी
हंसली मेघांतुनी चांदणी
तुझ्या तनूवर मोरपिसारा मोहरून आला ॥ २ ॥

घडून गेली क्षणांत किमया
ही मदनाची मंथर माया
बहरधुंद त्या स्वप्नघडीला चंद्र फितुर झाला ॥ ३ ॥

गायक - सुधीर फडके, संगीत - विश्वनाथ मोरे

## हाच का माझा गुन्हा ?

भंगलेल्या त्या स्मृतींना आळवीतों मी पुन्हा
हाच का माझा गुन्हा ? ॥ धृ. ॥

भाववेडी रम्य प्रीती स्वप्न अपुलें तें बसंती
संपलें सारें तरी मी आठवीतों त्या खुणा ॥ १ ॥

रंग विरला भावनांचा बहर सरला जीवनाचा
घोळवीतों तीच गाथा गिळुनि साऱ्या वेदना ॥ २ ॥

दुःख माझें हें गुलाबी त्यांतली धुंदी शराबी
शोधितों त्यांतून विरल्या प्रीतिच्या संवेदना ॥ ३ ॥

गायक - सुधीर फडके, संगीत - विश्वनाथ मोरे

## उजळूं स्मृती कशाला ?

उजळूं स्मृती कशाला अश्रूंत दाटलेली ?
सांगूं कशी कहाणी स्वप्नांत रंगलेली ? ॥ धृ. ॥

आतूर लोचनांचे ते लाजरे बहाणे
मौनांत साठलेलें हितगूजही दिवाणें
नातीं मनामनाचीं भाषेविनाच जुळलीं ॥ १ ॥

तें फूल भावनेचें कोषांत आज सुकलें
संगीत अंतरींचें ओठीं विरून गेलें
हृदयास जाळणारी आतां व्यथाच उरली ॥ २ ॥

तूं दाविलेंस सखया, मज चित्र नंदनाचें
उधळून तेंच गेलें संचीत जीवनाचें
आतां कुठें किनारा माझी दिशाच चुकली ॥ ३ ॥

गायिका - आशा भोसले, संगीत - सुधीर फडके,
चित्रपट - आम्ही जातो अमुच्या गावा

## रसिका, मी कैसें गाऊं गीत ?

रसिका, मी कैसें गाऊं गीत ?
दाटून आले घन आसवांचे मिटलेल्या पापणींत ॥ धृ. ॥

तुटल्या मनाच्या हळुवार तारा
गेला सुरांचा जळुनी फुलोरा
नाचे प्रलय लयींत ! ॥ १ ॥

मैफल् सुखाची झाली विराणी
उरे वेदनांची जखमी कहाणी
रडतें स्वप्न व्यथीत !' ॥ २ ॥

विझली स्वरांची आरास आतां
सरली अभागी ती भावगाथा
झाला जन्म पतीत ! ॥ ३ ॥

गायिका - अनुराधा पौडवाल, संगीत - अनिल-अरुण

# सजणा, कशासी अबोला ?

सजणा, कशासी अबोला ?
घडला, असा रे माझा काय गुन्हा ? ॥ धृ. ॥

छळितो मजसी हा दुरावा
ध्यास तुझा जुलमी !
मोहरली वसुधा तरी कां
सावन हा विरही ?
नवरंगी पुकारि माझि साद तुला
नवरंगी पुकारी साद तुला ! ॥ १ ॥

भास तुझा फुलवी सुखाचा
पारिजात हृदयीं
आस मनीं झुरते अनोखी
व्याकुळल्या समयीं
रतिरंगीं बुडालि अशि चंद्रकला
रतिरंगीं बुडाली चंद्रकला ! ॥ २ ॥

गायिका - अनुराधा पौडवाल, संगीत - अनिल-अरुण

## कुहु कुहु कुहु येइ साद

कुहु कुहु कुहु येइ साद
उधळित वनिं स्वरतुषार
मधुर हे तराणे, ऋतुराज आज आला ! ॥ धृ. ॥

सुमनांचे रंग रंग ऋतु-रंगित झाले
गंधगीत रतिचंचल अवनीवर दरवळलें
वारा भिरभिर हा तोडी बंध ॥ १ ॥

विहगांचें अंतरंग मदमंथर झालें
स्वप्नशिल्प कलिकांच्या अधरावर थरथरलें
सारें स्थिरचर बघ होई धुंद ॥ २ ॥

**गायिका** - अनुराधा पौडवाल, **संगीत** - अनिल-अरुण

## श्यामसुंदरा, नंदकिशोरा

श्यामसुंदरा, नंदकिशोरा, भुलवि तुझा अनुराग
मनपाखरूं कशी आवरूं, तू सांग सांग सांग सांग
चित्तचकोरा ! ॥ ध्रु. ॥

तुझ्या प्रीतिची धुंद बासरी दरवळते हृदयांत
युगायुगांचें नातें अपुलें फुलारलें क्षितिजांत
सोनरंगी तव मोहिनी, सरे भान भान भान भान
रे मनमोरा ! ॥ १ ॥

दिशादिशांना व्यापुन उरलें रूप तुझें अनिवार
जिवाशिवाचें घडलें मीलन, बरसे अमृतधार
तव चिंतनीं बघ लोपले, मम प्राण प्राण प्राण प्राण
रे घननीळा ! ॥ २ ॥

गायिका - अनुराधा पौडवाल, संगीत - अनिल-अरुण

## शिवशंकर ते आज पाहिले

चित्र जयांचें मनीं रेखिलें
शिवशंकर ते आज पाहिले ॥ धृ. ॥

ध्यानमयी तें रूप मनोहर
वदनावरचें तेज शुभंकर
स्वप्नच माझें सगुणरुपानें जणूं मूर्त झालें ॥ १ ॥

समीप येतां अधिर पाउलीं
अमृतांत ही काया न्हाली
तनूमनाचें भान प्रियाच्या चरणांवर वाहिलें ॥ २ ॥

अतां दुजेपण कुठें राहिलें ?
अवघें जीवन शिवमय झालें
या देहाचे बंध तोडुनी अनंतास पर्णिले ॥ ३ ॥

गायिका - माणिक वर्मा, संगीत - प्रभाकर जोग

## आज तुजसाठीं

आज तुजसाठीं, या पाउलांना, रे पंख फुटले
झनक झन झन्, मदिर सरगम, अधिर मन झालें ॥ धृ. ॥

प्रीती अनोखी आली बहारा
देहीं नशेचा नाचे पिसारा
धुंदींत जग हें आतां नहालें ॥ १ ॥

आतूर धरणी भेटे नभाला
आतां किनारा नाही सुखाला
नातें युगाचें फुललें निराळें ॥ २ ॥

गायिका - आशा भोसले, संगीत - श्रीकांत ठाकरे, चित्रपट - शूरा मी वंदिले

---

## नातें जुळलें मनाशीं मनाचें

नातें जुळलें मनाशीं मनाचें
फुले गीत ओठीं, अनोख्या सुरांचें ॥ धृ. ।

कशी मूर्त केली खुळ्या लोचनांनीं
तुझ्या अंतरींची अबोली कहाणी ?
कसें फूल झालें, दिवाण्या कळीचें ? ॥ १ ॥

जळे ही मिठी बावऱ्या लोचनांची
जशी भेट होते नदी-सागराची
मनीं नाचती हे, रंग अमृताचे ॥ २ ॥

उरे ध्यास भवतीं नुरे भान कांहीं
सुगंधांत न्हाल्या दिशा धुंद दाही
क्षणीं रूप दिसलें, मला नंदनाचें ॥ ३ ॥

गायक - जयवंत कुलकर्णी, संगीत - डी. एस्. रुबेन

# माझा सांवरिया

आला आला ग, आला ग, माझा सांवरिया
कशी सावरूं माझी मला
येइ फुलुनि फुलुनि क्षण सौख्याचा
मनीं चांदणें घेइ झुला ! ॥ धृ. ॥

सावळें रूप त्याचें श्रावणमेघापरी
भोळी खुळी मी बाई भुलुन खुलुन गेलें
माझ्या नजरेची भाषा
    अबोल भाषा
कशी बाई सांगू सांगू त्याला ग ? ॥ १ ॥

रविकिरणांचें तेज, चंद्राचें चांदणें
श्यामरंगी प्रीत त्याची श्यामल श्यामल शोभे
शतजन्मींचें नातें
    अरूप नातें
मी मीरा अन् राधा ग ! ॥ २ ॥

गायिका - उषा मंगेशकर, संगीत - अनिल- अरुण

# शोधूं नको मना रे

शोधूं नको मना रे तूं अर्थ जीवनाचा
अज्ञात खेळ चाले हा ऊन-सावल्यांचा ॥ धृ. ॥

असते इथें निराशा आशेंत गुंफलेली
स्वप्नें सजून येती वैफल्य माळलेलीं
हास्यांत साठलासे उद्घोष आसवांचा ॥ १ ॥

बहरांतल्या कळीला निर्माल्य शाप देतें
बाधा तशी जरेची कां यौवनास होते ?
उदयासवेंच ठरतो आकार शेवटाचा ॥ २ ॥

या आगळ्या कथेचें वेड्या अगम्य सूत्र
त्याच्यांत गोवलेले सारेच प्राणिमात्र
हें सूत्र हालवीतो हुंकार संचिताचा ॥ ३ ॥

गायिका - अपर्णा मयेकर, संगीत - श्रीनिवास खळे

# हा मदिर भोवताल

हा मदिर भोवताल स्वप्न-भारला
या सुखांत धुंद आज होउं दे मला ! ॥ धृ. ॥

लोचनांत रिमझिमलीं वीजपाखरें
स्पर्शांतुन जाईचे उमलले तुरे
थरथरत्या गुंजनांत जीव गुंतला ॥ १ ॥

शब्दांना ओठांवर मिटुन राहुं दे
मौनांतच सार जग विरुन जाउं दे
श्वासांतुन बहरूं दे स्वप्न-सोहळा ॥ २ ॥

गायिका - पुष्पा पागधरे, संगीत - श्रीनिवास खळे

# कळीचें फूल झालें

अबोली भावनांचें गीत हें उमलून आलें
कळीचें फूल झालें !
इषारे लोचनांचे, पिसारे भावनांचे
देहावरी मंथर शहारे थरथरले
कळीचें फूल झालें ! ॥ धृ. ॥

मधुमंजिरी तव अंतरीं, मधुमास गे झंकारला
मदभारल्या गात्रांतुनी, रतिरंग हा ओथंबला
अधरावरी जादूभरी रसमाधुरी धुंदावली
या पाकळींतुन गंधगाणें दरवळलें ॥ १ ॥

तव भर्जरी मौनांतुनी मनमोहिनी हसली उषा
ही वादळी किमया तुझी, तेजाळल्या माझ्या दिशा
संकेत गे कळला तुझा, सुखस्वप्न तें फुलवून जा
आता तुझे सारे बहाणे विरघळले ॥ २ ॥

गायक - सुरेश वाडकर, संगीत - श्रीकांत ठाकरे

## प्रीती तुझी

प्रीती तुझी मनमोहिनी
फुलवी मनीं संजीवनी ॥ धृ. ॥

पारिजात बहरुनि आला
धुंद तुझ्या स्पर्शामधुनी
नवरंग मोहरलेला
दीपराग नाचे नयनीं
भारावल्या देहांतुनी, झंकारली ही सौदामिनी ॥ १ ॥

साद तुझी जादूभरी
फुले उरीं बाधा कसली ?
लाट ही सुखाची माझ्या
जीवनांत भरुनी उरली
हृदयांतल्या या वृंदावनीं, तूं राधिका गे नंदिनी ! ॥ २ ॥

गायक - हेमंतकुमार, संगीत - प्रदीप-विलास

## प्रीतिचा रसीला नशीला तराणा

प्रीतिचा रसीला नशीला तराणा
फुले धुंद ओठीं छंद हा दिवाणा
रंगरूप याचें मला कां कळेना ॥ धृ. ॥

शीळ घालतो हा गुलजार वारा
फुलें देति कसला गुलाबी इषारा ?
सुटे आज माझा रेशमी उखाणा ॥ १ ॥

अनंगी कथेचा अर्थ सापडेना
भर्जरी नशेचा कैफ हा सरेना
कशी आवरूं मी, तोल सावरेना ॥ २ ॥

कुणी गुंफिले हे अनामीक धागे
स्वप्न मखमली कां होइ आज जागें ?
पूर अमृताचा कसा ओसरेना ? ॥ ३ ॥

**गायिका** - कृष्णा कल्ले, **संगीत** - डी. एस्. रुबेन,
**चित्रपट** - वसंत आला परतून

## मेघमल्हारी

तो – मेघमल्हारी नवसाला पावलं
ती – अहो धरतीचं सपान फुललं ॥ धृ. ॥

तो – बिगि बिगी चल ग कार्‌भार्‌नी
जोसांत करुंया नांगरनी
जलधारांना उधाण आलं ॥ १ ॥

ती – काल्या आईची किर्पा हो फळली
हिरव्या रंगानं शिवारं नटलीं
कणाकणांत बियाणं रुजलं ॥ २ ॥

ती – बगा पान्यानं निवली धरती
तो – आतां मातींत पिकत्याल मोती
दोघे – कसं घामानं इमान राखलं ॥ ३ ॥

तो – तुला सोन्यानं मढवीन् कार्‌भार्‌नी
ती – नको मला तुम्हाविन काय् बी धनी
दोघे – धन सुगीचं शेतांत पिकलं ॥ ४ ॥

गायक - जयवंत कुलकर्णी, पुष्पा पागधरे व समूह,
संगीत - डी. एस्. रुबेन चित्रपट - वसंत आला परतून

# अधीर याद तुझी

अधीर याद तुझी, जाळितसे रे दिल्‌वर
अशीच वाट तुझी, पाहुं किती मी दिल्‌वर्? ॥ १ ॥

तमांत चंद्र फुले, रात रुपेरी हंसते
फुलून हांसुं कशी, एकटीच मी दिल्‌वर्? ॥ २ ॥

तें स्वप्न आज निखाऱ्यांत जहालें घायल्
हवा तुझाच बसंती, बहार रे दिल्‌वर् ॥ ३ ॥

मदीर ध्यास तुझा, छेडितसे या हृदया
बहाल जन्म अतां, तुजवरती रे दिल्‌वर् ॥ ४ ॥

गायिका - शोभा गुर्टू, संगीत - श्रीकांत ठाकरे

## मैफल् सुनी सुनी

थकलें प्रिया कधींची मी वाट पाहुनी
वाटे तुझ्याविना रे मैफल् सुनी सुनी ॥ धृ. ॥

त्या रेशमी स्मृतींचा श्रृंगारसाज ल्यालें
सुखस्वप्न मीलनाचें हृदयीं अधीर झालें
गाऊं कशी रसीली मी प्रीतरागिणी ? ॥ १ ॥

कां ओसरून गेली फुलतांच स्वप्नमाया
घायाळ लोचनांना भासे उदास दुनिया
छळते मला नशीली ती धुंद मोहिनी ॥ २ ॥

भारावल्या मनीं रे घुमतो तुझा पुकारा
झाला तुझ्याचसाठीं आतूर जन्म सारा
ध्यासांत आज गेलें हें विश्व लोपुनी ॥ ३ ॥

गायिका - अनुराधा पौडवाल, संगीत - सुधीर फडके,
चित्रपट - चोराच्या मनांत चांदणे

## संशय कां धरिला ?

संशय कां धरिला ?
फूल प्रीतिचें फुललें नुकतें
काटा कां रुतला ? ॥ धृ. ॥

एकांतांतिल रात्र दिवाणी
भाव उमलतां मिटलीं वाणी
रतिरंगाचा धुंद सोहळा चांदण्यांत भिजला ॥ १ ॥

त्या शपथा त्या आतुर भेटी
दोन मनांच्या जुळल्या गाठी
सौभाग्याचा मंगल ठेवा ओंजळींत आला ॥ २ ॥

तोडुं नका ना दुवे मनांचे
नातें अपुलें शतजन्मांचें
तुमच्यावांचुन अर्थ नसे या जीवनास उरला ॥ ३ ॥

गायिका - आशा भोसले, संगीत - सुधीर फडके,
चित्रपट - चोराच्या मनात चांदणे

## राजसा, जीव तुला वाहिला

भाग्य उजळलें या जन्माचें
धुंद होउनी तनमन नाचे
स्वर्ग लाभला मला
राजसा, जीव तुला वाहिला ! ॥ धृ. ॥

स्वप्न माझें मूर्त झालें, सूर सारे जुळुनि आले
रोमरोमीं गीत नटलें, भोवतींचें भान सरलें
मनिं वसंत फुलुनी आला ॥ १ ॥

प्रीत तुझी जादूभरी, आस माझी झंकारली
भाषेविण प्रीतिकथा आज कशी साकारली
फुलाला गंध आला, सुखाला रंग आला
भरुनी ऊर आला, खुषीला पूर आला ॥ २ ॥

गायिका - अनुराधा पौडवाल, संगीत - सुधीर फडके,
चित्रपट - चोराच्या मनात चांदणे

## गीत प्रीतीचें

तो – स्वप्नधुंद भाव मनीं हंसले कसे ?
गीत प्रीतीचें बहरूनी आलें !
ती – सूर सूर अंतरींचे जुळले असे
गीत प्रीतीचें आज झंकारलें ! ॥ धृ. ॥

तो – जागलें फूल कोषांतलें
लाभलें चित्र भासांतलें
ती – कशी सांगूं तुला गूज ओठांतलें ?
गुंफले बंध श्वासांतले
रंगले ऋतु प्राणांतले
तो – या सुखाच्या क्षणीं विश्व भारावलें
मूर्त तुझी ध्यानीं मनीं स्वप्नीं वसे ॥ १ ॥

ती – झुलवूं झुला आनंदाचा
सजवूं साज संसाराचा
प्रीतीची बासरी दरवळे अंतरीं
तो – फुलवूं स्वप्न तें वादळी
नटवूं स्वर्ग या भूतलीं
दोघे – साथ ही राहुं दे जन्मजन्मांतरीं
रंग रंग जीवनांत खुलले असे ॥ २ ॥

गायक - सुरेश वाडकर, अनुराधा पौडवाल, संगीत - अनिल-अरुण ,
चित्रपट - बंदिनी

## आज आहें मुक्त मी

आज आहें मुक्त मी, ना मनहि माझें बंधनीं
मी तुझी रे स्वामिनी बंदिनी ! स्वामिनी बंदिनी ! ॥ धृ. ॥

प्रीत माझी आज मजला साद घाली वादळी
वीजवेडी ओढ माझ्या अंतरंगीं दाटली
स्वप्न तें नेणार मजला भावनांच्या नंदनीं ॥ १ ॥

पावलांना आज फुटले पंख पागल भर्जरी
झेप घेई हृदय निर्भर भान-मिटल्या अंबरीं
लोपले ते बंध सारे भारलेल्या जीवनीं ॥ २ ॥

आज वाटे धुंद व्हावें निर्झरांच्या गायनीं
सागरीं या विरुन जावें लाट होउन देखणी
या सुखाच्या चांदण्यांतच जन्म द्यावा झोकुनी ॥ ३ ॥

**गायिका** - अनुराधा पौडवाल, **संगीत** - अनिल-अरुण, **चित्रपट** - बंदिनी

## तुझ्यासाठिं केले मीं सोळा शृंगार

तुझ्यांसाठिं केले मीं सोळा शृंगार
आज मनीं नाचे सुखाची बहार ! ॥ धृ. ॥

बाई ग ! ध्यास लागे जिवाला कसला ?
मीच झालें हो परकी मजला-बाई ग !
छंद इष्काचा जुलमी जडला
कशी बोलूं मी तोलूं मी झेलूं मी सारे इषारे
आज अंगांत रंगांत देहांत झाले पुकारे ! ॥ १ ॥

सजणा ! कळी मधाळ माझी फुलवा
काया रसाळ मिठींत झुलवा-अहो राया !
माझ्या मनींचा हेतु राया पुरवा
कशी बोलूं मी तोलूं मी झेलूं मी सारे इषारे
आज अंगांत रंगांत देहांत झाले पुकारे ! ॥ २ ॥

गायिका - आशा भोसले, संगीत - राम लक्ष्मण, चित्रपट - देवता

## मी शरण तुला जय अंबे मा

मी शरण तुला जय अंबे मा
अंबे मा, जगदंबे मा ॥ धृ. ॥

चरणिं तुझ्या सुखशांति मिळे
पापवासना दूर पळे
तूं दुर्गा, तूं काली मा, तूं लक्ष्मी, संतोषी मा
महिषासुरमर्दिनी, देवी पार्वति मा ॥ १ ॥

तुझ्या कृपेची नवलाई
वाल्याचा वाल्मिकि होई
शक्तीदेवी तूं महान, दूर करीं अमुचें अज्ञान
मायभवानी भक्तांना तूं दे वरदान ॥ २ ॥

त्यागामधुनी पुण्य मिळे
सत्कर्मांचीं गोड फळें
एकविरा तूं सत्यवती, तूंच शारदा सरस्वती
आदीमाते, दे आम्हाला शुद्धमती ! ॥ ३ ॥

गायिका - आशा भोसले, संगीत - रामलक्ष्मण, चित्रपट - लाखाराणी

## खेळ कुणाला दैवाचा कळला ?

तो – खेळ कुणाला दैवाचा कळला ?
तूं असो, मी असो, हा असो, कुणी असो
दैवलेख ना कधीं कुणा टळला ! ॥ धृ. ॥

ती – जवळ असुनही कसा दुरावा ?
भाव मनींचा कुणा कळावा ?
खेळ कुणाला दैवाचा कळला ? ॥ १ ॥

तो – हार कुणाची ? जीत कुणाची ?
झुंज चालली दोन मनांची
खेळ कुणाला दैवाचा कळला ? ॥ २ ॥

ती – सौभाग्याला मिळे सहारा
मला न माहित कुठें किनारा
खेळ कुणाला दैवाचा कळला ? ॥ ३ ॥

तिघे – तूं असो, मी असो, हा असो, कुणी असो
दैवलेख ना कधीं कुणा टळला
खेळ कुणाला दैवाचा कळला ? ॥ ४ ॥

गायक - आशा भोसले, उषा मंगेशकर, सुरेश वाडकर
संगीत - राम लक्ष्मण, चित्रपट - देवता

## ये ना, सजलीं स्वप्नें नयनीं

ये ना, सजलीं स्वप्नें नयनीं ! ॥ धृ. ॥

हंसती लहरी चंद्रा बघुनी
उमले कलिका भ्रमरा भुलुनी
झुरते मिलना हळवी रजनी ॥ १ ॥

मेघामधुनी खुणवी बिजली
नवख्या हृदयीं धुंदी भरली
घे ना जवळी अपुली म्हणुनी ॥ २ ॥

कितिदा विनवूं तुजला अजुनी ?
जळते अधिरा विरही हरिणी
कां रे छळिसी सारें कळुनी ? ॥ ३ ॥

गायिका - सुमन कल्याणपूर, संगीत - राम कदम, चित्रपट - पारध

## अश्रूजलांत विरली गाथा

अश्रूजलांत विरली गाथा जुन्या खुणांची
ओठावरीच मिटली ती साद अंतरींची ! ॥ धृ. ॥

धुंदावल्या मनाला होता बहार आला
नयनीं फुले तराणा कैफांत भारलेला
परि ओसरून गेली माया खुळ्या क्षणांची ॥ १ ॥

श्वासांत साठलेलें सरलें सुरम्य नातें
जखमी मनोरथांना तें स्वप्न रोज छळतें
विझल्या मनांत उरली आरास वेदनांची ॥ २ ॥

तुटण्यास का जुळाल्या वाळूवरील वाटा ?
दूरांत लोपल्या कां उसळून दोन लाटा ?
कां पालवी जळाली फुलल्या मनोगतांची ? ॥ ३ ॥

गोठून अश्रु गेले; थिजली गळ्यांत भाषा
प्रीतीविना जिण्याची नुरली मनांत आशा
आतां वळून गेली जाणीव जीवनाची ॥ ४ ॥

**गायक** - अरुण दाते, **संगीत** - अनिल मोहिले

## शोधूं कुठें तुला मी ?

शोधूं कुठें तुला मी, आई कुणा म्हणूं मी ?
हीं आसवें कशीं ग, मज सांग आवरूं मी ? ॥ धृ. ॥

तोडून प्रेमपान्हा झालीस पाठमोरी
दाही दिशांत तुजला हें बाळ हांक मारी
ममता अतां कुणाची दुःखांत पांघरूं मी ? ॥ १ ॥

प्रेमस्वरूप मूर्ती अठवे क्षणाक्षणाला
नाहीं तुझ्याविना गे शोभाच वैभवाला
पंखाविना अतां ग, घायाळ पाखरूं मी ॥ २ ॥

कां लाविलीस माया तव लाडक्या पिलांना
गेलीस कां निघूनी सोडून लेकरांना
घरटेंच कोसळे हें त्या सावरूं कसें मी ? ॥ ३ ॥

**गायिका** - अनुराधा पौडवाल, **संगीत** - अशोक पत्की, **चित्रपट** - आई पाहिजे

## मी तुझी जाहलें

ती – लोचनीं रेखिलें भाग्य तें लाभलें
आज रे साजणा मी तुझी जाहलें ॥ धृ. ॥

तो – हात हे गुंफिले श्वासही गुंतले
कंप देहावरी ओठ झंकारले
ती – प्रीतिचें चांदणें अंतरीं रंगलें ॥ १ ॥

तो – बाहुपाशांत ये आस धुंदावली
मी किनारा तुझा लाट तूं वादळी
ती – मुक्त या मीलनीं बंधही लोपले ॥ २ ॥

तो – साथ माझी-तुझी ही अशी राहुं दे
ती – स्वर्ग भासांतला भूवरी येउं दे
दोघे – सौख्य तें साहुं दे जीवनीं आगळें ॥ ३ ॥

**गायक** - अनुराधा पौडवाल, सुदेश भोसले, **संगीत** - अशोक पत्की
**चित्रपट** - मधुचंद्राची रात

# घुंगरू हे धुंद झाले

छुम् छननन, छुम् छननन, घुंगरू हे धुंद झाले !
अधिर अधिर तन, मदिर मदिर धुन, माझें मन डोले ॥ धृ. ॥

रुणझुण तालावर जीव हा भरारी घेई
पुकारिती पुन्हा पुन्हा दाही दिशाही
जादूभरी ही साद अनोखी
बेभान या वाऱ्यापरी पंख लाभले ॥ १ ॥

नभीं जरी भरारलें गुंतलें तुझ्याशीं नातें
आसावल्या ओठीं तुझें गीत आळवीतें
तोडूं कसे मी बंध रेशमाचे
युगें युगें तुझ्यासवें साथ ही जुळे ॥ २ ॥

गायिका - आशा भोसले, संगीत - अशोक पत्की, चित्रपट - मधुचंद्राची रात

## ताटातुटी कां ?

ताटातुटी कां माय-लेकरांची ?
माया भुकेली फिरे माउलीची ॥ धृ. ॥

देऊं पिलांना कसा प्रेमपान्हा
जिव्हाळा मिळेना जगीं पोरक्यांना
सांगूं कुणाला व्यथा अंतरींची ? ॥ १ ॥

आईविना ना जगतीं उबारा
वात्सल्य देई सुखाचा निवारा
व्याकूळ झाली ममता मनींची ॥ २ ॥

लाडक्या पिलांना मिळाला किनारा
आज माउलीचा जन्म सार्थ सारा
आस तृप्त झाली जळत्या जिवाची ॥ ३ ॥

गायिका - अनुराधा पौडवाल, संगीत - अशोक पत्की, चित्रपट - अर्धांगी

## तुझें गीत ओठीं

तो - तुझें गीत ओठीं तुझा हात हातीं
ती - भाव अंतरींचे तुला साद देती ॥ धृ. ॥

तो - तुला बोलवेना, मला आठवेना
अशी ही सुखाची मिठी सोडवेना
कुणीं गुंफिल्या या मनीं खूणगांठी ॥ १ ॥

ती - फुले रोमरोमीं प्रीतीचा पिसारा
नसे आज माझ्या सुखाला किनारा
इथें स्वर्ग माझा उभा हा सभोतीं ॥ २ ॥

तो - छेडिल्या सतारी तुझ्या पापण्यांनीं
सूर चांदण्याचे धुंद जीव दोन्ही
ती - रंग भावनांचे एकरूप झाले
जणूं चांदतारे ओंजळींत आले
तो - कशाला दुरावा अशा धुंद रात्रीं ॥ ३ ॥

गायक - सुरेश वाडकर, अनुराधा पौडवाल, संगीत - अशोक पत्की,
चित्रपट - मामला पोरींचा

## सांवरे श्याम श्रीहरी

सांवरे श्याम श्रीहरी
मी झालें तुजविण बावरी ॥ धृ. ॥

मंतरलेले सूर ऐकुनी भान मला नुरलें
बंध जगाचे तोडुनि सारे धावत मी आलें
ही छळते वैरिण बांसरी ॥ १ ॥

रतिरंगाची नवथर बाधा जडली रे मजला
धुंद नशेचा मोरपिसारा तनूमनीं फुलला
मी विरलें या सुखसागरीं ॥ २ ॥

जिवाशिवाचें जुळतां नातें मीपण हें सरलें
जगावेगळें युगायुगांचें मीलन रे अपुलें
हें नटलें नंदन भूवरी ॥ ३ ॥

**गायिका** - ज्योत्स्ना हर्डीकर, **संगीत** - अनिल मोहिले

## तूं प्रेमनगरचा राजा

ती - तूं प्रेमनगरचा राजा, मी तुझीच प्रेमदिवाणी
चल सांगूं या जगताला, ही अपुली प्रेमकहाणी
तो - ही साथ तुझी अन् माझी, सुटणार कधीं ना सजणी
चल सांगूं या जगताला, ही अपुली प्रेमकहाणी ॥ ध्रु. ॥

तो - ही धुंद नशा लजवंती, डोळ्यांत तुझ्या ग कसली ?
ती - गुलजार तुझ्या स्पर्शाची, जादू ही सजणा सगळी
तो - हे गाल गुलाबी गहिरे, देतात इषारे कसला ?
ती - ही तुझीच किमया सजणा, मी हरवुन बसलें मजला
तो - नखऱ्यांत शराबी तुझिया, हा जीव गुंतला राणी
ती - चल सांगूं या जगताला, ही अपुली प्रेमकहाणी ॥ १ ॥

तो - तव लाजलाजऱ्या ओठीं, हा रंग कशाचा फुलला ?
ती - हें गुपित साजणा कैसें, शब्दांतुन सांगूं तुजला ?
तो - हातांत गुंफितां हात, मज कैफ सुखाचा चढला
ती - या क्षणीं वाटतें सजणा, जणुं स्वर्ग भूवरी आला
तो - बेबंद होउनी गाऊं, प्रीतीची सुंदर गाणीं
दोघें - चल सांगूं या जगताला, ही अपुली प्रेमकहाणी ॥ २ ॥

गायक - सुरेश वाडकर, अनुराधा पौडवाल, **संगीत** - राम-लक्ष्मण
चित्रपट - आम्ही दोघे राजाराणी

# सजणा किती आळवूं मी तुला ?

सजणा किती आळवूं मी तुला ?
ही बसंती निशा, चांदण्याची नशा, जाळते रे मला ! ॥ धृ. ॥

कोंडलेल्या भावनांचा पूर दाटे मनीं
एकली मी गुंफितें रे आसवांचे मणी
हें विराणें गीत माझें कां कळेना तुला ? ॥ १ ॥

साहवेना हा दुरावा दूर राहूं किती ?
मीलनाचा ध्यास मजला आज घाली मिठी
ऐक ना आकांत माझा हे प्रीतिच्या फुला ॥ २ ॥

या कळीचें फूल व्हावें आस जागे खुळी
प्रेमगंधानें नहावी पाकळी पाकळी
त्या सुखानें धुंद व्हावा पापण्यांचा झुला ॥ ३ ॥

गायिका - कृष्णा कल्ले, संगीत - डी.एस्. रुबेन, चित्रपट - वसंत आला परतू

## पिर पिर पिर पिर पाव्साचीं

पिर पिर पिर पिर पाव्साची
त्रेधा-तिरपिट सगळ्यांची ! ॥ धृ. ॥

रस्त्यावर मोटारगाड्यांची
शर्यत लागली पोहायची
बाबांना ऑफिसची घाई फार
छत्रीला त्यांच्या लागली धार
फजिती झाली कपड्यांची ॥ १ ॥

ताईच्या साडीवर परीटघडी
चिखलाची सुंदर उठली खडी
दादाच्या रेनकोटचा भलताच थाट
पावसानें उसवली त्याची पाठ
भंबेरी उडाली फॅशनची ॥ २ ॥

कुणितरी सांगा हो कांहीं उपाय
गुरुजींचा चिखलांत फसला पाय
शाळेला सुट्टी पडली उगाच
घरांत बसायचा माझ्यामागें जाच
संधी हुकली भिजायची ॥ ३ ॥

गायिका - शमा खळे, संगीत - मीना खडीकर

# आला आला पाउस आला

आला आला पाउस आला, बघा बघा हो आला
पाउस आला ॥धृ. ॥

काळ्या काळ्या मेघांमधुनी
शुभ्र कशा या धारा झरती
अवतीभवती झुलूं लागल्या जलधारांच्या माळा ॥ १ ॥

हसलीं झाडें हसलीं पानें
फुलें पाखरें गाती गाणें
ओल्या ओल्या मातीचाही श्वास सुगंधी झाला ॥ २ ॥

धरणी दिसते प्रसन्न सारी
पागोळ्यांची नक्षी न्यारी
फांदीफांदीवरी थाटली थेंबांची ही शाळा ॥ ३ ॥

लेवुनिया थेंबांचे मोती
तरारलीं गवताचीं पातीं
वसुंधरेनें पांघरिला जणुं हिरवा हिरवा शेला ॥ ४ ॥

गायक - रचना, योगेश, शमा, संगीत - मीना खडीकर

## होउं नको रे निराश

होउं नको रे निराश, मनुजा,
होउं नको रे निराश !
उन्हामागुनी मिळे सावली
तिमिरांतून प्रकाश ! ॥ ध्रु. ॥

अवसेमधुनी पुनव उमलते
मातीमधुनी जीवन हसतें
शुष्क धरेला फुलवी खुलवी
रम्य नवा मधुमास ! ॥ १ ॥

निर्धारानें चल रे पुढतीं
अशक्य कांहीं नसतें जगतीं
नियतीला तूं मुठींत ठेवुनि
दैवाला करिं दास ॥ २ ॥

गायक - प्रभाकर कारेकर, संगीत - डी. एस्. रुबेन,
चित्रपट - वसंत आला परतून

## दत्त दत्त नाम

सदा मुखीं आळवावें दत्त दत्त नाम
नामाविण संसारांत नाहीं सुखधाम ! ॥ धृ. ॥

नको नको लपंडाव, आसुावले डोळे
गुरूविना भोवतींचें जग अंधारलें
दत्तपदीं दुःखीतांना लाभतो विश्राम ॥ १ ॥

दत्तगुरूचिंतनांत जीव हा रमावा
दत्तनाम चिरंजीव देतसे विसांवा
मिळे पूर्ण कैवल्याचें भक्ताला इनाम ॥ २ ॥

गुरूनामभजनाचा लागे नित्य छंद
दाटे माझ्या अंतरंगीं आनंदाचा कंद
गुरूचरणांचा झालों अखंड गुलाम ॥ ३ ॥

गायक - अजित कडकडे, संगीत - शांक-नील

## आकांत माझ्या भावनांचा

आकांत माझ्या भावनांचा मी कितीदा ऐकला
जीवनाचा तोल नाहीं या व्यथेनें मापला ॥ १ ॥

आटलें जरि हास्य माझें एकदा स्वप्नासवें
त्या दुधारी वेदनेला बोल ना मी लाविला ॥ २ ॥

फुलविलेल्या संचिताचीं जाहलीं शकलें परी
कोंडलेला हुंदका मी बंद ओठीं साहिला ॥ ३ ॥

गायिका - श्यामा चित्तार, संगीत - प्रदीप-विलास

## टिप टिप टिप टिप पाऊस पडतो

ती – टिप टिप टिप टिप टिप टिप, पाऊस पडतो
अंग अंग झालें, चिंब ओलें, गारवा सलतो
थरथर अधरीं, नवथर पदरीं
मीलना आतुरलें मन माझें साजणा ॥ धृ. ॥

तो – पहिल्यावहिल्या आतुर भेटी
फुलें रेशमी हंसलीं मनवेलीवरती
ती – तुला न कळलें मला न कळलें
कधीं हवीशीं जुळलीं तीं नाजुक नाती
तो – इष्काचें चांदणें, रंगलें धुंदीनें
स्पर्श होतां तुझा झुकलीं हीं लोचनें
ती – तनमन भिजलें, कणकण उमले
जाऊं या देहभान विसरुनी साजणा ॥ १ ॥

तो – भ्रमर चुंबितो कळ्या-फुलांना
छेडूं फुलराणी, चल प्रेमतराणा
ती – फुलून आल्या अधिर भावना
बेहोषीचा दे मजला नजराणा
तो – सप्तरंगांत या जाऊं धुंदावुनी
बाहुपाशांत ये दुरावा सोडुनी
दोघें – जाऊं या एकरूप होउनी सांग ना ! ॥ २ ॥

गायक - विनय मांडके, अनुराधा पौडवाल, संगीत - अशोक पत्की
चित्रपट - राजाने वाजवला बाजा

## थंड ही हवा

थंड ही हवा, धुंद गारवा
हा पाऊस रिमझिम बरसे ॥ धृ. ॥

रेशिमधारा या रुणझुणती
जलथेंबांचे उधळित मोती
पानफुलें नाचती, गंध फुले भोवतीं
झुलती जलांचे आरसे ! ॥ १ ॥

काजळकाळ्या या आकाशीं
वीज रेखिते सुंदर नक्षी
वारा खुळा होउनी, नाचे कसा अंगणीं
गाणें खुषीचें गातसे ! ॥ २ ॥

हिरवीं शेतें हिरवीं रानें
फुललीं भवतीं हिरवीं कवनें
नटली बघा ही धरा, झोक तिचा साजिरा
नवरी नवेली ही दिसे ! ॥ ३ ॥

गायिका - पुष्पा पागधरे, संगीत - डी. एस्. रुबेन

## आइ, मला पावसांत जाउं दे

आइ मला पावसांत जाउं दे
एकदाच ग भिजुनी मजला चिंब चिंब होउं दे ॥ धृ. ॥

मेघ कसे हे गडगड करिती
विजा नभांतुन मला खुणविती
त्यांच्यासंगें अंगणांत मज खूप खूप नाचुं दे ॥ १ ॥

खिडकीखालीं तळें साचलें
गुडघ्याइतकें पाणी भरलें
तऱ्हेतऱ्हेच्या होड्यांची मज शर्यत ग लावुं दे ॥ २ ॥

बदकांचा बघ थवा नाचतो
बेडुकदादा हाक मारतो
पाण्यामधुनी त्यांचा मजला पाठलाग करुं दे ॥ ३ ॥

धारेखालीं उभा राहुनी
पायानें मी उडविन पाणी
ताप, खोकला, शिंका, सर्दी वाट्टेल् ते होउं दे ॥ ४ ॥

गायक - योगेश खडीकर, संगीत - मीना खडीकर

## ये रे ये रे पावसा

ये रे ये रे पावसा, रुसलास कां ?
माझ्याशिं गट्टी फू केलिस कां ? ॥ ध्रु. ॥

झर झर झर तूं येणार कधीं ?
अंगणांत पाण्याची होईल नदी
ढगांच्या मागें असा लपलास कां ?
माझ्याशिं गट्टी फू केलिस कां ? ॥ १ ॥

गार गार वाऱ्यांत नाचेन मी
खूप खूप पाण्यांत भिजेन मी
विजेचि टाळि मला देतोस का ?
माझ्याशिं गट्टी फू केलिस कां ? ॥ २ ॥

धड् धड् धुडुम् कानांत बसले दडे
काळ्या काळ्या मेघांचे डोंगरकडे
टप् टप् पडतील थेबांचे सडे
पाणि, पाणि, पाणीच सगळीकडे ! ॥ ३ ॥

धुमधार पाण्यांत रस्ता बुडेल
मग माझ्या शाळेला सुट्टी मिळेल
गड् गड् गड् आतां हसतोस कां ?
माझ्याशिं गट्टी फू केलिस कां ? ॥ ४ ॥

गायिका - रचना खडीकर, संगीत - मीना खडीकर

## मोहरलें मस्त गगन

मोहरलें मस्त गगन
सळसळतो धुंद पवन
प्रीतीचें गाइ कवन
भिरभिरते बावरी, देहाची भिंगरी ! ॥ धृ. ॥

मंथर अनोखे हे पुकारे
भोवतालीं दाटले
छंदी अनंगाचे इषारे
रोमरोमीं नाचले
नजरेची कस्तुरी दरवळली अंतरीं
थरथरली शर्वरी रे साजणा ! ॥ १ ॥

चंचल् नशेचे हे उखाणे
लोचनांनीं छेडिले
फंदी तरंगांचे पिसारे
अंतरंगीं रंगले
श्वासांची मोहिनी लखलखली अंबरीं
धुंदी ही वादळी रे साजणा ॥ २ ॥

गायिका - पुष्पा पागधरे, संगीत - डी. एस्. रुबेन

## घे भरारी नभीं पांखरा

घे भरारी नभीं, पांखरा,
दे झुगारून हा पिंजरा ! ॥ धृ. ॥

ही निळाई नवी साद घाली तुला
मोकळी ही हवा धुंद घेई झुला
हा दिशांचा फिरे भोवरा ॥ १ ॥

शीळ घाली अतां भर्जरी देखणी
मुक्त छंदांत, रे, रंगु दे रागिणी
दाद देई तुला ही धरा ॥ २ ॥

आज पंखांत रे वीज माळून घे
मुक्त बेहोषिचा साज लेवून घे
घेइं कवळून या अंबरा ॥ ३ ॥

गायिका - पुष्पा पागधरे, संगीत - डी. एस्. रुबेन

## बाळा तुझ्याच साठीं

बाळा तुझ्याच साठीं, ममता भुकी माउलीची
साहूं कशी वेदना रे या अंतरींची ? ॥ धृ. ॥

वणवा जळे भोवतालीं
नाहीं कुणीच वाली
माया तुला साद घाली
पाजूं कुणाला, पान्हा उरींचा, शिक्षा मला ही कशाची ? ॥ १ ॥

तान्ह्यास कां दूर नेतां ?
कां प्राण हिसकून घेतां ?
बाळाविना जन्म खोटा
फोडून टाहो सांगे जगाला आई अभागी कधींची ॥ २ ॥

जवळी असूनी दुरावा
कां शाप मजला मिळावा ?
शोधूं कुठें मी विसावा ?
लाभो तुला रे सुखभाग्य सारें, ही आस माझ्या मनींची ॥ ३ ॥

बाळा तुला जोजवीतें
हळुवार अंगाइ गातें
हृदयांत वात्सल्य दाटे
पंखांत घेतां तुज लाडक्या रे, बरसात होई सुखाची ॥ ४ ॥

गायिका - अनुराधा पौडवाल, संगीत - अशोक पत्की, चित्रपट - अर्धांगी

## विझवा हो विझवा

रात रसीली रंगरंगेली ही धुंदीची बरसात नशेली ॥ धृ. ॥

अंग अंग नाचे, बंध कुणाचे,
रतिरंगानें दुनिया फुलली
विझवा विझवा विझवा
विझवा हो विझवा, आग माझी विझवा
कुणीतरी आज मला पावसांत भिजवा ! ॥ १ ॥

मिरगाच्या धारा, उठला शहारा
चिंब करा काया, मला मिठींत झुलवा
नवतीचा वारा घुमतो भरारा
इष्काच्या मस्तींत, राया, मला मिरवा
तुम्हीतरी या नाहींतर वैद्याला बोलवा ! ॥ २ ॥

छळते ही रैना, कुणी केली दैना ?
छंदीफंदी मन माझं थाऱ्यावर राहीना
करितें इषारा वाजतील बारा
आतांतरी अर्जी माझी ऐकून घ्या ना
तुम्हीतरी या नाहींतर वैद्याला बोलवा ! ॥ ३ ॥

गायिका - उषा मंगेशकर, संगीत - राम लक्ष्मण, चित्रपट - सूडाची आग

# गूज कसें सांगु तुला ?

अबोल अंतरिंचें, गूज कसें सांगु तुला ?
तुझाच छंद अनावर छळतो आज मला ॥ १ ॥

आतुर साद तुझी, मोहरलीं भावफुलें
नशीलि धून तिची, कां मिठींत घेई मला ॥ २ ॥

फितूर ध्यास तुझा, उठवी मनीं उधाण खुळें
जिवास धुंद किनाराच अतां ना उरला ॥ ३ ॥

कणाकणांत भरे, वादळली ओढ तुझी
अशी तुझ्यांत बसें, लोपवून मीच मला ॥ ४ ॥

गायिका - शोभा गुर्टू, संगीत - श्रीकांत ठाकरे

## माझें मला कळेना

माझें मला कळेना ! कां सूर हा जुळेना ?
हृदयांत दाटलेली हुरहूर साहवेना ! ॥ धृ. ॥

गुलजार पापण्यांनीं विणल्या अधीर ताना
धुंदावल्या स्वरांचा फुलला मनीं तराणा
त्या लाजऱ्या नशेचा कां कैफ हा सरेना ? ॥ १ ॥

हांकारिते मनाला ती स्वप्नधुंद वाट
चुंबूनि बिंब जेथें घेई मिठींत लाट
ढळली निशा तरी का तो सोहळा विरेना ? ॥ २ ॥

देहावरी सुखाच्या झरती अनंत धारा
मनमोर नाचतो हा फुलवून कां पिसारा ?
या भर्जरी व्यथेचा कां अर्थ सापडेना ? ॥ ३ ॥

गायिका - शोभा गुर्टू, संगीत - अनिल मोहिले

## पावसाची रात रे

पावसाची रात रे, तुझी माझी साथ रे
झालें वेडीखुळी, प्रीतीची फुलली कळी ! ॥ ध्रृ. ॥

कोसळती बघ या जलधारा
मनमोराचा चिंब पिसारा
शिळ वाऱ्याची देइ इषारा
गंध खुलला सोनसळी ॥ १ ॥

जलथेंबांची हळवी नक्षी
बसले बिलगुनि ओले पक्षी
काहुर उठवी वन गुलहौशी
फितुर मनाच्या संथ जळीं ॥ २ ॥

हात असूं दे हातीं सखया
चिंब भिजूं दे नवथर काया
श्वासमिठीचा फुलव शहारा
थरथरणाऱ्या धुंद दलीं ॥ ३ ॥

गायिका - पुष्पा पागधरे, संगीत - डी. एस्. रुबेन

## रेशमी गुन्हा

कशि सांगूं कुणाला हा रेशमी गुन्हा ?
तुझ्या प्रीतीचा लागे रे छंद साजणा ! ॥ ध्रृ. ॥

अधरावरती मौन गुलाबी, नयनीं लाख उखाणे
श्वास अनोखे वादळलेले, गाती धुंद तराणे
अंगाअंगांत नाचे हा कैफ दिवाणा ॥ १ ॥

त्या स्पर्शाच्या हिंदोळ्यावर झुललें तनमन सारें
देहावरती झगमगले रे मंथर वीजपिसारे
राया छळती मला या अनंगी खुणा ॥ २ ॥

कशी आवरूं ? कशी सावरूं ? फसवे सर्व बहाणे
दिशादिशांना गुपीत कळलें अपुलें राजसवाणें
साद घालूं किती रे तुला मी पुन्हा ? ॥ ३ ॥

गायिका - चारुशीला बेलसरे, संगीत - डी.एस्. रुबेन

## ही कोण सुंदरी ?

ही कोण सुंदरी, गुणमंजिरी ?
चित्र देखणें मूर्त होउनी आलें का भूवरी ? ॥ धृ. ॥

कुरंगनयना मनोहारिणी
रूपयौवना रसिकमोहिनी
पानामधली लालस नवखी कलिका जणुं लाजरी ॥ १ ॥

गौरगुलाबी वदनचंद्रमा
गालावरती रम्य लालिमा
चित्त भुलविते ललितकोमला कनकांगी साजिरी ॥ २ ॥

नयन छेडिती स्वर इष्काचे
मनांत फुलती रंग सुखाचे
प्रेमचंद्रिका उगवे माझ्या प्रणयातुर अंतरीं ॥ ३ ॥

गायक व संगीत - शिवानंद पाटील

## खेळ मांडु या खेळ

*(यक्ष-गंधर्वांचें समूहगीत)*

खेळ मांडुं या, खेळ मांडुं या, खेळ मांडु या चला
या खेळाचा मेळ माहिती जगन्नायकाला ! ॥ धृ. ॥

अम्ही न सेवक स्थितीगतीचे अथवा देवांचे
निर्विकार हो दास अम्ही तर अतर्क्य नियतीचे
खेळामधल्या सुखदुःखाची क्षिती न आम्हाला ॥ १ ॥

येइ कुणाच्या हातीं येथें दुःखाचा प्याला
पदीं कुणाच्या स्वर्ग सुखाचा असतो झुकलेला
हास्यामधुनी कधीं उमलते अश्रूंची माला ॥ २ ॥

या खेळाचा रंग चिरंतन कीर्ती अपरंपार
कधीं लाभतो हार यशाचा कधीं कपाळीं प्रहार
हुकुमाचें कुणि पान खेळतो भलत्या खेळीला ॥ ३ ॥

कधीं मोडतो कसा अचानक डाव रंगलेला
बघतां बघतां मधेंच विरतो भाग्याचा शेला
हार कुणाची, जीत कुणाची, तमा न आम्हांला ॥ ४ ॥

अभंग चाले खेळ कशाला बंधन काळाचें
अंगण लाभे अखंड याला अनादि-अंताचें
मर्म सनातन या खेळाचें कळे न कोणाला ॥ ५ ॥

गायक - रवींद्र साठे, संगीत - भास्कर चंदावरकर,
नाटक - नल दमयंती (वसंत कानेटकर)

## प्रीत माझी-तुझी

प्रीत माझी-तुझी तुझ्या-माझ्यांत रे
खूण शोधूं नको रानावनांत रे ॥ धृ. ॥

आल्या धुंदावुनी भावनांच्या सरी
भान गेलें बुडून आज दिगंतरीं
पूर ओसंडला अंतरंगांत रे ॥ १ ॥

शब्द झाले रिते आज बोलूं नको
वीज स्पर्शांतली आज तोलूं नको
जीव सैराटला देहबंधांत रे ॥ २ ॥

गुंतल्या रेशमी खूणगांठी अशा
लोपल्या लोपल्या रीतभाती कशा
तृप्तिचा सोहळा प्राणरंगांत रे ॥ ३ ॥

गायिका - रंजना जोगळेकर, संगीत - नंदू होनप

# आलें तुझ्याच साठीं

ओठांत रानगीतें देहांत रानवारे
आलें तुझ्याच साठीं चुकवून मी पहारे ॥ धृ. ॥

बेभान कैफयात्रा उठल्या उधाणलाटा
बेबंद भोवतींच्या गेल्या पुसून वाटा
आसक्त रोमरोमीं घुमले तुझे पुकारे ॥ १ ॥

स्पर्शातल्या विजांचें नयनीं तुफान उठलें
आवेग मीलनाचा रे आरपार उसळे
देहावरी नशेचे फुलले किती फुलोरे ॥ २ ॥

श्वासांत श्वास भिनतां हा भुवनगोल डोले
आभाळ लौकिकाचें कोठें विरून गेलें
बेभान वेचिले मी नक्षत्र सूर्य तारे ॥ ३ ॥

गायिका - मंजुषा केळकर, संगीत - मीरा केळकर

## जखमी कहाणी

आणूं नकोस आतां तूं लोचनांत पाणी
कळणार ना कुणाला जखमी तुझी कहाणी ॥ धृ. ॥

कां बेगडी स्वरांशीं तूं जुळविलास धागा ?
या मैफलींत नाहीं तुजला कुठेंच जागा
कोंडून ठेव हृदयीं रक्ताळली विराणी ॥ १ ॥

मधुमास प्रीतीचा तो आला निघून गेला
कां शाप वंचनेचा प्रणयार्त यौवनाला ?
सजली पराभवाची आरास जीवघेणी ॥ २ ॥

कां गुंफिलीस माला फसव्या मनोरथांची ?
चाले इथें दलाली साऱ्याच भावनांची
चुकली तुझीच खेळी, दुनिया असे शहाणी ॥ ३ ॥

**गायिका** - उत्तरा केळकर, **संगीत** - प्रभाकर पंडित

## मन हें मानत नाहीं

सख्या रे, मन हें मानत नाहीं
तुज भेटाया तुज शोधाया
फिरतें दिशांत दाही ॥ धृ. ॥

कमळकळीसम प्रीत उमलली
शृंगाराची वेल बहरली
भ्रमरापरि मी तुझ्याभोवतीं
लहरत विहरत राहीं ॥ १ ॥

बाधा जडली प्रणयसुखाची
नातीं जुळलीं युगायुगांचीं
जीवभाव हा अतां वाहिला
अवघा तुझ्याच ठायीं ॥ २ ॥

गायिका व संगीत - बकुल पंडित

## सांग ना मनमोहना

सांग ना मनमोहना !
कशी तुज येईना करुणा ? ॥ ध्रृ. ॥

जाऊं दे मज घरीं परतुनी
सांज कधींची गेली उलटुनि
किती रे करिशिल नटखटपणा ॥ १ ॥

पदर चुरगळे साज विखुरला
सर्वांगांतुन कंप पसरला
कशा रे लपवूं साऱ्या खुणा ? ॥ २ ॥

कुजबुज करितिल सख्या, मैत्रिणी
भलती शंका घेतिल कोणी
लावितिल बोल मला रे उणा ! ॥ ३ ॥

गायिका व संगीत - बकुल पंडित

## तेजोमय भास्करा

हे तेजोमय भास्करा
तिमिर नाशुनी प्रकाश उधळित येईं तेजेश्वरा ॥ धृ. ॥

तव तेजाचें दे संजीवन
अमंगलाचें करिं निर्दालन
अणुरेणूला देईं दिव्यता सदया दुरिताहरा ॥ १ ॥

गगनमणी तूं सदा शुभंकर
अर्घ्य वाहतें तुला चराचर
किरणप्रभेच्या उज्ज्वलतेनें उजळीं अवघी धरा ॥ २ ॥

तूंच प्रेरणा सत्यशिवाची
तूंच धारणा या जगताची
धगधगणाऱ्या अमर दीप्तिचा उद्‌गाता तूं खरा ॥ ३ ॥

गायक व संगीत - शिवानंद पाटील

## ते सूर नवे फुलणारे

ते सूर नवे फुलणारे
ते शब्द मनीं झुलणारे
तें गीत तुझें सजणा रे
मी गाउं कसें रे, गाउं कसें ? ॥ १ ॥

गुलजार अशा एकांतीं
हळुवार फुले ही प्रीती
मधुभाव बहरुनी येती
तुज दावुं कसे रे दावुं कसे ? ॥ २ ॥

बेभान धुंद या रातीं
जुळलेल्या रेशिमगांठी
प्रणयाचे हे नजराणे
तुज देउं कसे रे देउं कसें ? ॥ ३ ॥

मिलनांत तुझ्या रे नाथा
हरवून किनारे जातां
माझी नच उरलें आतां
सुख साहुं कसें रे साहुं कसें ? ॥ ४ ॥

गायिका - मधुवंती दांडेकर, संगीत - मोहन दांडेकर

## माझ्याच भावनांचा

माझ्याच भावनांचा मी अंत साहिला
माझ्याच आसवांचा मी अस्त पाहिला ॥ १ ॥

बरसात चांदण्याची झाली सभोवतालीं
मी देह त्या प्रवाहीं आकंठ दाहिला ॥ २ ॥

ती पालखी सुखाची आली निघून गेली
हा कोरडा किनारा सुनसान राहिला ॥ ३ ॥

विजयी पराभवांचा जल्लोष रंगला
दिलदार प्राक्तनाला मीं जन्म वाहिला ॥ ४ ॥

गायिका - उत्तरा केळकर, संगीत - भूमानंद बोगम

# धुंद हा एकांत

धुंद हा एकांत आणिक वेळ ही जादूभरी
चुंबितां तव हात राणी स्वर्ग आला भूवरी ॥ धृ. ॥

लोचनीं झुलती तुझ्या धुंदावलीं फुलपाखरें
बिलगुनी ओठांस बसलें स्मित बिलोरी लाजरें
पाहुनी मुखचंद्र मादक पूर उसळे अंतरीं ॥ १ ॥

माधवी-लतिकेपरी आलीस फुलुनी जीवनीं
चित्र तें स्वप्नांतलें मीं पाहिलें जागेपणीं
दे इषारा तूं खुषीचा अधिरलों मी सुंदरी ॥ २ ॥

जवळ तूं येतांच हृदयीं चांदणें झंकारलें
भारलेल्या स्पंदनांचीं रेशमी झालीं फुलें
रोमरोमीं दरवळे ही प्रणयवेडी बांसरी ॥ ३ ॥

गायक - अरुण इंगळे, संगीत - बाळ बर्वे

# भातुकलीचा खेळ संपला

भातुकलीचा खेळ संपला मोडुन गेलिस डाव
अजून नाहीं बुजला माझ्या हृदयावरला घाव ॥ धृ. ॥

हवेंहवेंसें घडून गेलें
ठसे अंतरीं रुतुनि राहिले
तहानलेल्या ओठावरतीं तुझें कोरलें नांव ॥ १ ॥

पुनवेच्या सुखरात्री सरल्या
उधाणलाटा विरून गेल्या
खुणा तुझ्या शोधीत धांवतें मन माझें भरघांव ॥ २ ॥

माझें संचित मजला कळलें
ऐल-पैलही दूर लोपले
कधींच नाही बहरणार हा उजाडलेला गांव ॥ ३ ॥

गायक - अरुण इंगळे, संगीत - बाळ बर्वे

# खुळी मी फसलें

भेटाया तुजला किती बहाणे रचले
वागणें कलंदर तुझें, खुळी मी फसलें ॥ धृ. ॥

भुलविंती मला संकेत तुझे लडिवाळ
शोधीत खुणा मी फिरतें रानोमाळ
हा लपंडाव रे खेळुन खेळुन थकलें ॥ १ ॥

तव नजरगुंफणी देते आणाभाका
ओठांत नाचती धुंद अबोली हांका
हें प्राणपाखरूं तुजसाठीं आतुरलें ॥ २ ॥

हृदयांत उसळती प्रणयगुलाबी लाटा
येणार कधीं तूं सांग जिवलगा आतां
ध्यासांत तुझ्या रे मीपण माझें सरलें ॥ ३ ॥

गायिका - मंजुषा केळकर, संगीत - मीरा केळकर

## पाहतों तुझीच वाट

पाहतों तुझीच वाट, करुं नको उशीर फार
ये सखे अतांच तूं, जोंवरी असे बहार ॥ धृ. ॥

आज नूर अंतरीं, ओढ धुंद लोचनीं
स्वप्नसूर छेडतात धून एक देखणी
करुं अतांच जीवनांत बंधमुक्त सुखविहार ॥ १ ॥

आसपास बहरली प्रणयधुंद चांदरात
बाहुपाश अधिरला, मिलनगंध तनमनांत
ऐकशील तूं कधीं, उत्कट-आर्त ही पुकार ॥ २ ॥

उद्यां विरेल हें उधाण, लोपतील का‌ठकांठ
त्या तशा रितेपणीं नको नकोच भेटगांठ
आस विफल मिरवुं दे, लेवुनी तुझा नकार ॥ ३ ॥

गायक - रवींद्र बिजूर, संगीत - श्रीरंग आरस

## प्रीतीचा सावन

प्रीतीचा सावन अवचित बरसुन गेला
तनमनांत हिरवी तृप्ती रुजवुन गेला ॥ धृ. ॥

ती हवी हवीशी स्पर्शाची चतुराई
त्या चिंब निथळत्या श्वासांची नवलाई
रतिरंग अनोखे नयनीं सजवुन गेला ॥ १ ॥

थरथरत्या अधरीं सलील नक्षी नटली
त्या फुलदंशानें क्षणांत किमया केली
तो जन्मच माझा नशेंत भिजवुन गेला ॥ २ ॥

घननीळ तयाचें आलिंगन मनहारी
देहावर फुलली तृप्तीची फुलवारी
प्राणांत सुखाचीं लेणीं जडवुन गेला ॥ ३ ॥

गायिका - अपर्णा मयेकर, संगीत - दत्ता डावजेकर

## हें मस्त गगन

हें मस्त गगन, गुलजार हवा, मी धुंद चांदणें ल्यालें
तुजसाठिं सख्या सजुनी धजुनी मी रजनीगंधा झालें ! ॥ धृ. ॥

स्वप्नाचें फूल, नयनांत भूल
प्रीतीची हूल रिमझिमते
मिलनाची आस, सोनेरी भास
फुलपंखी साद भिरभिरते
ध्यासांत तुझ्या रे दरवळले नवरंग-रसांचे झेले ॥ १ ॥

झेलूं कशी ? तोलूं कशी ?
बाधा उरीं मदनाची
हांकारिते पुकारिते
व्याकुळ राधा युगांची
मंथर गहिऱ्या अनिवार मनीं काहूर अनंगी फुललें ॥ २ ॥

गायिका - पद्मजा बर्वे, संगीत - डी. एस्. रुबेन

## प्रीतिची रागिणी

कशि गुलजार मनीं फुलली प्रीतिची रागिणी
पौर्णिमा धुंद गहिरी बहरली जीवनीं ॥ धृ. ॥

भोवतीं गुंजले सूर ते मखमली
स्वप्न झंकारलें उमलतां पाकळी
ही कुणीं घातली भर्जरी मोहिनी ॥ १ ॥

भारल्या लोचनीं मयसभा थाटली
वीजपंखी नशा अंतरीं दाटली
थरथरे शर्वरी कैफ हा प्राशुनी ॥ २ ॥

हात हातीं असा राहुं दे साजणी
गीत हें गुंफुं दे आज प्राणांतुनी
रंगवूं प्रणयराग जन्म हा झोकुनी ॥ ३ ॥

गायक - श्रीकांत दादरकर, संगीत - अशोक पत्की

## हे सुंदरी

हे सुंदरी माझी तुझी ग प्रीती बिलोरी
फुलवी मनीं ही रागिणी जादूभरी ॥ ध्रु. ॥

जुई-चमेलीचा बहर हा तनूवर
गंध गे अनोखा मनीं नाचतो अनावर
अशी गुलजार तूं अशी अल्वार तूं
गुलाबी परी ! ॥ १ ॥

लेवुनी मदनाचा साज हा उभी तूं
नशील्या पुनवेची चंद्रिका नभीं तूं
भोळी खुळी चंपाकळी
तूं साजिरी ! ॥ २ ॥

हवा ही गुलाबी सामील् तुला ग
मनीं कां खुषीचा झुले हा झुला ग ?
हसणें तुझें, रुसणें तुझें
हें भर्जरी ! ॥ ३ ॥

गायक - विनय मांडके, संगीत - डी. एस्. रुबेन.

# चांदण्याचे पिसारे

भुलविती तुझ्या लोचनांचे इशारे
झंकारले मनीं चांदण्याचे हे पिसारे ! ॥ धृ. ॥

भाषा तुझी ग़ अबोली
भावरंगीं नहाली
साद गुल्ज़ार मंथर दिवाणी
अंतरंगीं तुझ्या गुंजली
उमजले मला हे तुझे छंद सारे ॥ १ ॥

गंध फुलूं दे प्रीतीचा
मिटूं नको पाकळी
या फुलांना कळ्यांना पिऊं दे
प्रेमधुंदी अनोखी नशीली
खुणविती तुला ते खुळे चांदतारे ॥ २ ॥

जुलमी तुझा हा दुरावा
फसवे अनंगी बहाणे
चंचल तुझ्या लोचनीं या
सजले कशाचे उखाणे ?
झुलविती तुला यौवनाचे पुकारे ॥ ३ ॥

गायक - विनय मांडके, संगीत - डी. एस. रुबेन

## घ्या इष्काचा विडा

करूं तरी किती बाइ अर्जी
करा बहाल मजवर मर्जी
रसरसलेल्या या नवतीचा दरवळतो केवडा
दिलवरा, घ्या इष्काचा विडा ! ॥ धृ. ॥

या विड्यास हिरवा रंग नवतिचा धुंद
चढविला रुपेरी वर्ख केशरी गंध
अधरमिठीने खुलवा; याला उशीर कां एवढा ? ॥ १ ॥

कळिदार विड्याची बघा गुलाबी किमया
वाटेल नशीली क्षणांत सारी दुनिया
रतिरंगाच्या मदनफुलांचा पडेल भवतीं सडा ॥ २ ॥

सेवुनी बघा ना याचा रसिलेपणा
तुमचाच मान हा सोडा परकेपणा
नका घालवूं एकांताचा योग असा कोरडा ॥ ३ ॥

गायिका - सुलोचना चव्हाण, संगीत - विश्वनाथ मोरे

## ऐक गजानना

ऐक गजानना, अंतरींचा धावा
देईं रे विसावा दयावंता
दुःखविनाशका, पूर्णस्वरूपा
बुद्धिसिद्धिदाता तूंच अनंता ! ॥ १ ॥

जगीं चक्र चाले ऊन-सावल्यांचें
मूळ प्रकाशाचें सांपडेना
दिसे उदयांत बीज विनाशाचें
गूढ या जगाचें उकलेना ! ॥ २ ॥

थवा भोवतालीं सख्यासोबत्यांचा
सूर जिव्हाळ्याचा गवसेना
माया-ममतेचा रंगला उत्सव
तिथें जीवभाव जडवेना ! ॥ ३ ॥

सुखाच्या उदरीं अंकुर दुःखाचा
खेळ संचिताचा आकळेना
देईं मज देवा निरंतर संग
सोहळा निःसंग जीवनाचा ! ॥ ४ ॥

गायिका व संगीत - प्रभा अत्रे

## नको मोति उधळूं

नको मोति उधळूं अशी हांसतांना
नभीं चंद्र झुरतो तुला पाहतांना ! ॥ धृ. ॥

तुझा साजशृंगार हा वादळाचा
छळी ग पिसारा तुझ्या कुंतलाचा
नको वेड लावूं फुलांना कळ्याना ॥ १ ॥

पहाणें तुझें ग झळाळी विजेची
बहाणे तुझे ग नशा चांदण्याची
तुझ्या यौवनाचा अनोखा उखाणा ॥ २ ॥

मला धुंद करितें तुझें रूप राणी
इषारे दिले ग तुझ्या लोचनांनीं
उमलणार केव्हां खुषीचा तराणा ? ॥३ ॥

गायक - रवींद्र साठे, संगीत - डी. एन्. रुबेन

## प्रीतिचा साज

प्रीतिचा साज हा आज मी ल्यालें
अंतरीं गुंजले रे सुखाचे उखाणे भारलेले ! ॥ धृ. ॥

तूं छेडितां सूर ते यौवनाचे
झंकारले घुंगरू पापण्यांचे
दाटलें चांदणें भोवतीं नशेनें रंगलेलें ! ॥ १ ॥

पारिजात देहीं फुलारून आला
मनीं मीलनाचा गंध सांठलेला
स्वप्न तें भेटलें रेशमी भावनेनें रेखिलेलें ! ॥ २ ॥

मी तोडिले बंध हे लौकिकाचे
किती प्राशिले मी घोट वादळाचे
गुंफिले प्राण मीं रे तुझ्या भोवतालीं उधाणलेले ॥ ३ ॥

गायिका - श्यामा चित्तार, संगीत - बाळ बर्वे

## हें धुंद चांदणें

हें धुंद चांदणें फुलली रात्र नशीली
बरसात प्रीतिची अपुल्या रंगमहालीं ! ॥ धृ. ॥

मधुजाल अनोखें कुणीं गुंफिलें नेत्रीं ?
बेहोष सुखाचा पूर उसळला गात्रीं
शृंगार लेवुनी प्रेमकहाणी सजली ॥ १ ॥

ही अशी राहुं दे मिठी नशेची भंवतीं
प्राणांत फुलूं दे नक्षत्रांच्या ज्योती
या क्षणाभोवतीं झुलती लाख मशाली ॥ २ ॥

रंगलें अंतरीं नर्तन वीजफुलांचें
देहांत दरवळे नातें शतजन्मांचें
ही अमृतघटिका कणाकणांतुन हंसली ॥ ३ ॥

गायिका - उत्तरा केळकर, संगीत - अनुराग शहा

## थांब चंद्रा सोबतीला

थांब चंद्रा सोबतीला, प्रियसखा येणार आहे
विरहरात्रीं जाळणारी ती व्यथा सरणार आहे ॥ १ ॥

अधिर वारे अधिर तारे अधिरले निःश्वास ओठीं
आज माझ्या तनमनांतुन चांदणें फुलणार आहे ! ॥ २ ॥

पापणीच्या पालखींतुन मूर्त त्याची मिरवली मी
आज त्याच्या रतिलिलांनीं रात्र ही सजणार आहे ॥ ३ ॥

मोगरीच्या या कळ्या शेजेवरी उमलून आल्या
आज रे माझ्या सुखाला पालवी फुटणार आहे ! ॥ ४ ॥

मीलनाच्या रजतरंगी उसळती देहांत लाटा
तृप्तिच्या डोहांत माझा जन्म हा बुडणार आहे ! ॥ ५ ॥

गायिका - पद्मजा फेणाणी, संगीत - अनुराग शहा

---

## दूर दूर तूं जरी

दूर दूर तू जरी मनीं भरून राहशी
भावनंदनांतली, तूंच माझि उर्वशी ! ॥ धृ. ॥

रंग रंग वेचुनी तुझेंच चित्र रेखितों
सूर सूर गुंफुनी तुझेंच गीत छेडितों
श्वास होउनी उरीं, तूंच तूंच विहरसी ॥ १ ॥

लोचनांत फुलविली तूंच हांसरी उषा
तुझ्यामुळें मनांतल्या उजळल्या दिशा दिशा
वसंतपालवीपरी जीवनांत बहरसी ॥ २ ॥

दूरता तुझी जरी जाळते अशी मना
जिथें तिथें तुझी स्मृती करितसे मला खुणा
जन्म हा असा प्रिये अमृतांत भिजविसी ॥ ३ ॥

गायक - रवींद्र साठे, संगीत - अनुराग शहा

## स्वप्न आज माझें

मुक्या भावनेला फूल एक आलें
स्वप्न आज माझें भाग्यवान झालें ! ॥ ध्रु. ॥

तुझी प्रीत ओठीं तुझा हात हातीं
मनीं नाचती रे सुखाच्या वराती
फुले सार्थकाचें गीत हें निराळें ॥ १ ॥

तुझ्या भावनांचा मिळाला निवारा
नसे आज माझ्या सुखाला किनारा
विश्व धुंद सारें तुझें रूप ल्यालें ॥ २ ॥

तुझ्या संगतीचें पुण्य आज भाळीं
उभा स्वर्ग माझा इथें या महालीं
चंद्रसूर्य माझ्या ओंजळींत आले ॥ ३ ॥

**गायिका** - साधना सरगम, **संगीत** - प्रभाकर पंडित

## ते सूर जरी ओघळले

ते सूर जरी ओघळले
ते शब्द जरी मावळले
बहरगीत मी गातें, बहरगीत मी गातें ! ॥ धृ. ॥

त्या गहिऱ्या वादळभेटी
जुळलेल्या हळव्या गांठी
पापणींत सारें फुलतें ॥ १ ॥

तुटले ते रेशिमधागे
परि भाव अंतरीं जागे
श्वासांत उमलतें नातें ॥ २ ॥

ही आग तुझ्या विरहाची
ही राख खुळ्या अश्रूंची
तव स्मृतींत सारें विरतें ॥ ३ ॥

गायिका - उषा वाघ, संगीत - यशवंत देव

## चांदणें दरवळलें हृदयांत

ही पुनवेची रात्र रंगली प्रीतीच्या बहरांत
चांदणें दरवळलें हृदयांत ! ॥ धृ. ॥

सूर बसंती लेवुन आले तव नयनांचे पक्षी
रेखियली त्या अधिर स्वरांनीं शृंगाराची नक्षी
प्राजक्तासम धुंद सुखाची झाली ग बरसात ॥ १ ॥

स्पर्शाचे झंकार अनोखे कणाकणांतुन हंसले
श्वासमिठीच्या हिंदोळ्यावर तनमन माझें झुललें
रतिरंगाचा फुले सोहळा स्वप्नांच्या महालांत ॥ २ ॥

भान लोपलें मिटलें अंतर गेला दूर किनारा
उधाणलेल्या देहावरती झरल्या अमृतधारा
युगायुगांचें जुळलें नातें त्या एका निमिषांत ॥ ३ ॥

**गायक** - राजेंद्र पै, **संगीत** - प्रभाकर पंडित

## कसं तुम्हाला समजत न्हाई ?

दूर कां हो सरतां, मागं पुढं बघतां
निघायची करुं नका घाई
कसं तुम्हाला समजत न्हाई ? ॥ धृ. ॥

तुमच्या डोळ्याला भिडला डोळा
लागे जिवाला भलता चाळा
नवतीचा खुळा पिकलाय् मळा
उठे पिकांत कोल्हेकुई ॥ १ ॥

अंगाअंगांत वादळ उठलं
उभ्या देहांत काहूर पेटलं
विरहाची दरी, खोल खोल उरीं
कधी कराल तुम्ही भरपाई ? ॥ २ ॥

माझी झुरनीला लागली काया
धन लाखाचं जाइल वाया
दिली हो सवलत, लुटून घ्या दौलत
करुं नका अशी कुचराई ॥ ३ ॥

गायिका - पुष्पा पागधरे, संगीत - प्रभाकर पंडित

# नको दूर लोटूं

नको दूर लोटूं दयावंता देवा
तूंच एक माझ्या जिवाचा विसावा ॥ ध्रृ. ॥

दोषांचा हा भार साठलासे माथीं
निवारी अनंता अपराध कोटी
धाव पाव नाथा, किती करूं धावा ? ॥ १ ॥

गोड तुझें नाम सिद्धीचें हें सार
तुझ्या ठायीं लाभे मुक्तीचें माहेर
नामचिंतनीं रे जन्म हा सरावा ॥ २ ॥

तुझ्या दर्शनाची लागलीसे आस
तोडीं या देहाचे सर्व मोहपाश
नको मायबापा अतां हा दुरावा ॥ ३ ॥

गायिका व संगीत - प्रभा अत्रे.

# प्रथमचरण सूची

